# मोगऱ्यांचीं फुलें

अर्थात्

## गंगाधर रामचंद्र मोगरे

यांची कविता

गुच्छ १ ला

अनुक्रमणिका—



प्रकाशक—नाडकर्णी आणि मंडळी.

मुंबईत,
जावजी दादाजी यांच्या "निर्णयसागर" छापखान्यांत छापिलीं.

जानेवारी, १९०२.

[ किंमत ६ आणे. ]

## पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी.



जन्म–५ आक्टोबर १८४४.

मृत्यु–११ आगष्ट १९००.

Mogryachi Pallas



# समर्पण.

निजमतिचेंच न केवळ वाग्देवीचेंहि सर्व भांडार
प्रकट करी ज्या निर्मुनि बुधवर तो रामचंद्रिकाकार; १

त्यजिता तथापि झाला होउनि निरुपाय तात तो जेव्हां,
पदरीं तुह्मी जयाला घ्याया सरसावलां पुढें तेव्हां; २

ज्या प्रेमें नरहरिला त्याच प्रेमें अखंड वाढवुनी;
जो आज लहानाचा थोर तुह्मीं ठेविला करोनि जनीं; ३

विविधज्ञानतरूंचा विबुधमतें जो सुरम्य आराम,
राहे रसिकजनांच्या विश्रामाचेंच होउनी धाम; ४

अठरा वर्षांपूर्वी उद्यानीं त्या लहानशी वेली
जी तुमच्याच करानें पुरुषोत्तमपंत! रोपिली गेली, ५

प्रेमामृतें निरंतर सिंचुनि जी वाढवूनि बाललता
करितां झालां तुमची प्रकट तुह्मी अनुपमेय वत्सलता. ६

जीं तुमच्याच दयेनें वेलीवर त्या कधीं कधीं आलीं,
रसिकादरास तुमच्या गुणसंगानेंच पात्रही झालीं; ७

त्याच फुलांतुनि कांहीं वेंचुनि गुंफोनि गुच्छ हा पहिला,
तुमच्या यशस्तनूवर भक्तीनें वाहिला असे वहिला. ८

गं. रा. मोगरे.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३९ | ११ | वितुधास | विबुधास |
| ६३ | ६ | द्या | द्या |

# प्रकाशकांची प्रस्तावना.

रा. रा. गंगाधर रामचंद्र मोगरे यांची बरीच कविता **विविधज्ञानविस्तार** मासिकपुस्तकामधून आणि अन्यद्वारा प्रसिद्ध झाली आहे. ती एकत्र करून छापण्याचें पुष्कळ दिवसांपासून आमचे मनांत होतें. परंतु अन्य व्यवसायांमुळें हा वेळपर्यंत तिकडे लक्ष देण्यास फावलें नाहीं. हल्लीं अर्वाचीन महाराष्ट्र कवींची कविता छापविण्याचा बडोद्यांत प्रयत्न चालला आहे असें ऐकून त्यास साह्य करावें या हेतूनें, आणि-"ऐसें मित्र कवीश्वर परमरसिकमान्य मोगरे ह्मणती" या आर्यार्धांत आमच्या रसज्ञ **बालबोध**कारांनीं रा. मोगरे यांचा आणि पर्यायानें त्यांच्या कवितेचा जो अयाचित आणि मनःपूर्वक गौरव केला आहे, त्याच्या योगानें प्रोत्साहित होऊन, हीं "मोगऱ्याचीं फुलें" महाराष्ट्र कवितेच्या भोक्त्यांस अर्पण करीत आहों.

या फुलांचा एकच गुच्छ केल्यास तो घेण्यास जड होईल असें वाटल्यावरून त्यांचे निरनिराळे चार गुच्छ करण्याचा विचार केला आहे. या पहिल्या गुच्छामध्यें गुंफिलेल्या पद्यकुसुमांचा नामनिर्देश मुखपृष्ठावरच केला आहे.

दुसऱ्या गुच्छामध्यें पुढील पद्यकुसुमें गुंफिलीं जातील.

१ बुद्धजन्मः २ आर्यभूपर्यटनः ३ प्रसिद्ध पोपकवीच्या इलियडपैकीं कांहीं भागांचें मराठी रूपांतरः ४ कन्यादान; ५ मधमाशीः ६ सह्याद्रि; ७ जगदेवचरित्र; ८ माझें झाडः ९ तापसीबाईः १० दुःखिताचें स्वसमाधान. ११ विजयिनीविजयाष्टकः १२ राष्ट्रीय स्तवन.

तिसऱ्या गुच्छांमध्यें पुढील विलापरव समाविष्ट होतील:—

१ विष्णु परशुराम शास्त्री पंडित; २ मुरारजी गोकुळदास; ३ दयानंद सरस्वती; ४ तुकोजीराव होळकर; ५ जयाजीराव शिंदे; ६ आनंदीबाई जोशी; ७ विश्वनाथ नारायण मंडलिक; ८ आवजी दादाजी; ९ फर्ग्युसनविलाप; १०. महाराणी व्हिक्टोरिया; ११ हरि माधव पंडित; १२ महादेव गोविंद रानडे.

चौथ्या गुच्छामध्यें आमच्या गंगाधरपंतांच्या वर नमूद केलेल्या व्यतिरिक्त ज्या इतर किरकोळ कविता आहेत त्यांचा समावेश होईल.

वरील व्यवस्थेंत क्वचित् फेरफार होण्याचाही संभव आहे.

गंगाधरपंतांनीं आर्यावृत्तामध्यें धुंडिराज कवीच्या **'अभिनव कादंबरी'**चें जें सुरस भाषांतर केलें आहे, तें स्वतंत्र छापलेलें आहे. त्याचें विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध होत असलेलें **वृंदा** हें सुरस आणि बोधपर काव्य संपूर्ण झाल्यावर स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध होईल.

इतकें हें प्रसिद्धीकरणाचें काम आमच्या हातून पार पडलें तर मराठी ग्रंथसंग्रहास थोडी तरी इष्ट भर घालण्याच्या कामीं आह्मीं अंशत: साहाय्यकारी झालों, याबद्दल आह्मांस खरोखर मोठें समाधान वाटेल.

खरें कवित्व मनुष्यास उपजतच प्राप्त होत असतें; केवळ अभ्यासानें तें संपादितां येत नाहीं. उत्तम कवि होण्याला सहृदयत्व, तन्मयवृत्ति, गंभीर मनोवृत्ति, उन्नत विचार, उदात्त कल्पनाचातुर्य, व्यवहारकुशलता, बहुश्रुतता, श्रवणमधुर शब्दांचें तारतम्यज्ञान, इत्यादि अनेक गोष्टी अवश्य आहेत. या कसोटीस प्रस्तुत कविता कितपत उतरते हें ठरविण्याचें काम आह्मी आतां आमच्या वाचकांवर सोंपवितों.

# मोगऱ्याचीं फुलें.

गुच्छ १.



विष्णु कृष्ण चिपळूणकर.



जन्म, २० मे १८५०. मृत्यु, १७ मार्च, १८८२.

झालीं गर्वाचलांचीं दृढतर शिखरें चूर्ण जीच्या प्रभावें,
दंभाचे सिंधु बिंदूसम गणुनि सदां रिक्त जीनें करावे,
अन्यायी राव रंकादिक सभय जिला हात जोडीत होते,—
हा हा! ती आमची कां न कळत हरिली लेखणी त्या कृतांतें! १

नेती नेवोत तूझें यवन हरुनियां द्रव्यभांडार सारें;
माघारीं त्यास येतां बघशिल जननी तूंच कालानुसारें!
नेलीं त्वत्पुत्ररत्नें हरण करुनियां जीं परी त्या कृतांतें,
आतां दृष्टीस तूझ्या पडतिल पुढती तीं कधीं आर्यमाते! २

गेलें स्वातंत्र्य गेलें न कळत सगळें, नष्ट ऐश्वर्य झालें,
केले म्लेंच्छीं स्वशौर्यें सकल सुत जिचे जिंकुनी दास केले;
झाली ऐशी असह्य स्थिति अनुभवुनी शुष्क जी आर्यमाता,
तीतें गांजोनि आतां मिरविसि पुरुषार्थास कां रे कृतांता! ३

साऱ्या आर्यमहीस दुःखद असे हें वृत्त काळा परी!
विद्युत्पातचि हा खरोखर महाराष्ट्र प्रदेशावरी!
गेलें भूषण आपलें ह्मणुनि ती **पुण्या**भिधाना पुरी
काळा! आज असेल सत्य बसली शोकार्णवाच्या तिरीं! ४

कां गे **पुण्य**पुरी! हिरा लपविला त्वां हा न कोठें तरी?—
जैसा कंसभयें व्रजीं लपविला श्रीदेवकीनें हरी.
चोरी·दुष्ट कृतांत तस्कर सदां त्वत्पुत्ररत्नांप्रती,
तूतें ठाउक हें असोनि पडली मोहीं तुझी कां मती? ५

गेला बाळ **गणेश** काळसदना सोडोनि जेव्हां तुला,
तेव्हां देउनि धीर धांवत तुझ्या जो सांत्वना पातला—
तो **विष्णू** तुजदेखतां निजपुरा नेला कृतांतें जयीं,
झाली काय असेल पुण्यनगरी तूझी अवस्था तयीं? ६

स्वातंत्र्याभिरुचि स्वबांधवजनां देईल विष्णू असा
होता आर्यशिरोमणे! भरंवसा आह्मांस जो फारसा,
त्याचा लावुनियां उगाच चटका जाया परत्राप्रती
वंधो! कां सरसावलासि? तुजला ही योग्य नाहीं कृती! ७

उद्योगें पारतंत्र्यीं असुनिहि करितों आर्यभूद्धार—ऐशी
तूझी भीमप्रतिज्ञा तुजविण दुसरा कोण ने शेवटासी?
आवेशें कास तूझी धरुनि सरकले जे पुढें याच कार्या,
जावें सोडोनि त्यां हें उचित तुज कसें वाटलें बंधुराया! ८

आशा आर्योन्नतीची तिळभर नुरली यापुढें काय?—किंवा
होवोनी श्रांत जासी रविसुतनगरा घ्यावयाला विसांवा?
कीं अस्मद्दुर्विधीची तुज बहु पडली भीड आर्यावतंसा!
ह्यासाठीं काय केला भरतजनपदाचा तुवां घात ऐसा? ९

हस्तीं घेउनि 'केसरी' तत्र गुणा वर्णीत होतों जयीं
विष्णो! त्या 'अरुणोदयें' कळविली त्वन्मृत्युवार्त्ता तयीं!
वाटे सत्य न वृत्त तें प्रथमतां माझ्या मनाला; परी
झाला संशय दूर सर्वहि पुढें एका क्षणाभीतरीं. १०

हातांतून गळोन शीघ्र पडला भूमीवरी केसरी;
आला दाटुनि कंठ, मोह शिरला येवोनियां अंतरीं.
केलें भाषण काय, काय करणें आहे पुढें, ही स्मृती
गेली सर्व निघोनि! एक घटिका भ्रांतींत होती मती! ११

दिवस निघुन गेला ह्याच चिंतेंत सारा,
क्षणभरहि न चित्तीं होय शांतीस थारा.
हर हर! जगदीशा! काय हा घात केला!—
ह्मणुनि वदत दुःखें घालवीलें निशीला! १२

नाहीं पाहियलें तुला, परिसिली नाहीं तुझी ती गिरा,
जी त्वच्छिष्यजनांस दे सुख जशी पीयूषधारा सुरां;
ठावा मात्र मला पराक्रम तुझ्या त्या लेखणीचा असे—
होते भीत जिला नृपालहि मनीं सिंहीस जैसे ससे! १३

नाहीं राजाश्रयाचा अनुभव अझुनी लेश ज्या दुर्भगेला,
जीचा धिक्कार बुद्धया रसिकजनगणीं आजपर्यंत केला,
भेणें जी पंडितांच्या बहुदिवसवरी नीचसंगेंच राही,
शास्त्रीं ठेवूं दिला न क्षणहि पद जिला सोंवळ्या ब्राह्मणांहीं; १४

जीला पाहुनियां निराश्रित अशी आश्वासिली वामनें,
मोरोपंतचि जीकडे वळवुनी घे पंडितांचीं मनें,
तात्यांनीं वरितां परत्र दिधलें त्वत्तातहस्तीं जिला,
होता वाटत जीस तात समची तो कृष्णशास्त्री भला; १५

जीला शृंगारवीराद्यखिल नवरसां सादरें सेववोनी,
होतां कालानुसारें तरुण मग अलंकारुनी ग्रंथरत्नीं
जीला तूंच स्वहस्तें रसिकजनकरीं योग्य अर्पावयाला,
जीच्या आम्ही वऱ्हाडी मुदित परिणया जाहलों यावयाला; १६

कोणी वैधव्य आलें म्हणति जन तुझ्या जीस देहावसानीं,
विष्णो! तूझी परी जी म्हणवुनि भगिनी आपणा धन्य मानी,
त्वां ज्या धर्मस्वसेचे बहुत पुरविले लाड देवोनि शिक्षा,
तूझा साहील आतां चिर विरह कशो ती महाराष्ट्र भाषा? १७

तारुण्याची न हीच्या तनुवरि अझुनी फांकली दिव्य कांति,
बोलें अद्यापि हीच्या रसिकजनगणश्रोत्रयुग्में न धाती,
हीच्या कौमारलीला अझुनि सुचविती ही न लज्जादुकूला
ल्याली. विष्णो! अशी ही असुनिहि कुमरी कां हिचा त्याग केला?

सारे आम्ही वऱ्हाडी मिळुनि तव यशोदुंदुभीच्या रवानें
विद्वद्वृंदांत हीच्या परिणयसमया गाजवूं उत्सवाने—
आशा ती आमची त्वां सफल न करितां स्वर्गधामास जावें!
अस्मत्प्रारब्धरेषा अघटित घडवी, काय तेथें करावें? १९

दिव्यामोदास जीच्या विबुधजनमनोभृंग सेवोनि धाले,
योगें सौरस्य जीच्या बुध म्हणति महाराष्ट्रभाषेस आलें,—
'माला' गुंफोनियां ती रुचिरतर अशा सन्निबंधप्रसूनीं
घालावी सांग आतां रसिकवरगळां तूजवांचूनि कोणीं? २०

कौमारींच स्ववीर्यें विभवबलमदोन्मत्त मानुष्य-हस्ती
केले ज्या त्वच्छिशूनें विगतमद जगीं गाजवाया स्वकीर्ति—
त्या बाळा 'केसरी'ला तव विरह कसा हा महाराष्ट्रसिंहा!
साहेल? स्वस्वभावा त्यजुनि करितसे शोक हा हा कसा हा!

ज्यांच्या चेतश्चकोरीं मुदित तव मुखेंदूस पाहोनि व्हावें,
तूझें वात्सल्य ज्यांनीं निशिदिन शयनीं भोजनीं आठवावें,
नाचे कर्णांतरंगीं अझुनि तव गिरा-राजहंसी जयांच्या,—
त्या त्वच्छिष्यांस जाळूं बघति जणु शिखा त्वद्वियोगानलाच्या!

विष्णो! ऊठ पहात वाट बसलों आम्ही तुझी सर्वही!
निद्रा योग्य नसे तुझ्यासम महाराष्ट्रप्रदीपास ही!
धांवें घालुनि कास! हांसत पुढें हो!—योग्य हेंची तुला;
होवोनी कृतकार्य त्यावरि पुढें घे दीर्घ विश्रांतिला! २३

हा हा! तूं उठतोसि कोठुनि! महानिद्रा तुला लागली!
आतां मूर्ति तुझी दिसे न पुढती ह्या आर्यभूमंडळीं!
जातां त्वां त्रिदशालयास दिधली आम्हांस जी देणगी—
ती त्वत्कीर्ति अखंड मात्र उरली आहे पुढें ह्या जगीं! २४

तूझें चित्र चरित्र पद्यकमलीं गुंफोनि केव्हां तरी
अर्पावें तुझिया स्मृतीस, धरितों इच्छा अशी स्वांतरीं;
ती सिद्धीप्रति पाववो प्रभु! परी आतां मला त्वत्स्मृती
बोलूं दे न पुढें, म्हणोनि बसतों क्षाळीत अश्रूंप्रती! २५





# महाराष्ट्रजनविलाप,

अथवा

## कोल्हापूरच्या चौथ्या शिवाजी महाराजांचा मृत्यु.



जन्म .........१८६३.    मृत्यु, २५ दिसेंबर १८८३.

ज्याच्या ऐकोनि वृत्ताप्रति सकल महाराष्ट्रवासी जनांचे
जावे पोळूनि कर्ण,—प्रकटुनि हृदयीं ज्वाळ शोकानळाचे—
अंतीं आणूनि आह्मांवर हर ! हर !! त्या आज घोर प्रसंगा,
शोकाघातें क्षणांत द्विविध विधि करी आमच्या अंतरंगा ! १

ज्याच्या सौख्यार्थ दुःखें बहु अनुभविलीं आमच्या बांधवांनीं,
यद्दुर्दैवप्रभावें अझुनि जन किती भोगिती मानहानी,
होतों पाहात ज्याच्या सतत निज मनीं वाट भाग्योदयाची,
येवोनि स्पष्ट कर्णीं शिव ! शिव !! पडते मृत्युवार्ता तयाची ! २

गेल्या आशा लया त्या ! श्रमहि फुकट ते सर्वही आज गेले;
नाहीं हा ! हा ! कपाळा ! तिळभर कवणा श्रेय संप्राप्त झालें !
ज्यांनीं ज्यांनीं यशाची धरुनि निजमनीं आस यत्नांस केलें,
दुःखाचा मात्र घ्याया अनुभव जन ते सर्वथा पात्र झाले ! ३

ज्वाळा दुःखानळाच्या निशिदिनिं तुजला जाळिती भूमिपाळा!
हा! हा!! येवोनि तूझा ह्मणुनि कळवळा निर्दया त्याहि काळा,
टाकावें शीघ्र तूझें हरण करुनियां एकदां दुःख सारें—
नेले तेणेंच तूझे असु निजसदना काय ऐशा विचारें? ४

होता स्तुत्य तुवां मनांत धरिला उद्देश काळा! खरा,
तत्सिद्ध्यर्थ उपाय मात्र न परी त्वां योजिला रे बरा!
हा! हा!! रोग तुझ्या असून जवळी काळा! सहस्रावधि,
कां रे दुर्मरणांत अंत करिसी तूं त्या नृपाचा कुधी? ५

किंवा याहुनि दुःख थोर निढळीं होतें तुझ्या राजया!—
जें पृथ्वीवर एकही न शकता कोणी तुला द्यावया—
ह्यासाठीं निजदूत धाडुनि तुला नेलें कृतांतें खळें,
जाळायास सदा समस्तहि महाराष्ट्रास दुःखानळें? ६

पूर्वी दिल्लीपतीचे हतबल करुनी वीर यत्पूर्वजांनीं
कालिंदीतीर केलें सकलहि भगवें स्वीय कीर्तिध्वजांनीं,
होते जोडीत ज्यांतें भिवुनि कर सदा रावही मोठमोठे,—
दुःखानें दीन आजी करुनि बसविले सर्वही ते मराठे! ७

हा! हा!! यत्पूर्वजांनीं निजरिपुरुधिरें भूतला रंगवीलें,
दुःखोद्वेगें तदंगीं प्रकटुनि नयनप्रांत आरक्त केले,
शस्त्राघातें क्षतांचे अमित उठविती जे ठसे शत्रुदेहीं,—
आतां तद्वंशजांचीं चरचर हृदयें फाडिती संकटें हीं! ८

ज्याचें छत्रचि मोडुनी कडकडां खालीं अकस्मात् पडे,
तें कोल्हापुर दीन होउनि कसें आजी अहा हें रडे !
सारे लोक करीत शोकरव हे निःशंक संमार्जिती
भूदेवीप्रति वर्षुनि झरझरा नेत्राश्रुधारांप्रती ! ९

काळा ! संधि कसा अपूर्व तुजला हा आज आला असे !
घेई साधुनि कार्य तें झडकरी चित्तीं तुझ्या जें वसे !
दुःखाश्रूदक भूवरी पडुनियां जें जातसे हें वृथा,
तेणें घे अभिषेक आज करुनी तूं आपणा सर्वथा ! १०

झालीं म्लान समस्त-लोक-वदनें ! उत्साह गेला लया !
तैसें होय घडे जसें यदुवरा वेढी जयीं काळया !
आक्रोशें सगळी दणाणुनि पुरी ती जातसे तत्वतां !
दुःखाच्याच जिथें तिथें श्रुतिपथा भेदीत जाती कथा ! ११

शोकध्वान घरोघरीं न दुसरें कांहींच कानीं पडे,
ह्या चर्चेविण आढळे न इतर व्यापार कोणीकडे;
केला प्रश्न जरी कसाहि भलता कोणाहि नारीनरा,
देती उत्तर–'आणिली मृति महाराजांस कां ईश्वरा !' १२

जागोजाग परस्परांस पुसती हे लोक शोकस्वरें,
'झालें कारण काय हो नृपवरप्राणप्रयाणा खरें ?'
कोणी संशययुक्त होउनि ह्मणे 'खोटीच ही बातमी;'
बोले त्यास दुजा 'स्वयें परिसिली ती राजवाड्यांत मीं.' १३

कोणी काढुनियां खिशांतुनि पुढें वृत्तांतपत्रा करी,
'द्या मी वाचुनि दावितों' ह्मणुनियां तों तें दुजा घे करीं;
'वाचा स्पष्ट' असें मधेंच तिसरा दीर्घ स्वरानें ह्मणे,
तों सांगे चवथा 'पुरे गलबला हा—चालवा वाचणें!' १४

सर्वांतें इतिहास तो ढळढळां लावी रडाया! परी,
त्यांमध्येंहि विशेष एक बसला जो हृत्कपाटावरी,
तो आघात न साहुनी सकळिकां सांगीतलें वाचकें,—
'आतां आटपितों, पुढें न रसना माझी वदाया शके!' १५

झाला कल्होळ, सारे ह्मणति "हर हर! श्रीवरा! काय केलें!
भृत्याशीं काय भूपें झगडुनि मरण स्वाग्रहें आणियेलें?
दोघांचे काय थोडे असतिल झगडे आजपर्यंत झाले?
हा हा! आतांच कैसें घडुनि परि असें कृत्य हें घोर आलें? १६

राजाराम सुधीस आठवुनि जी अद्यापि कोल्हापुरी
दुःखाश्रूंस वमी, कृतांत रुसला कां हा पुन्हा तीवरी?
तन्नाशाप्रति कारण ज्वर तरी होऊनि गेला; परी
झाला दुर्मरणप्रसंगवश हा! हें फार बाधा करी! १७

तुला राया! होती दिवस बहु ही सोडुनि पुरी,
पहाया झालों रे! ह्मणुनि तुज उत्कंठित; परी
विधीच्या इच्छेनें उलट घडुनी ये सकलही!
कशी आतां पाहे पुढति तुज कोल्हापुर मही? १८

राज्याचीं सर्व सूत्रें धरुनि निजकरीं पाळितां ह्या जनांतें
पाहूं काळानुसारें तुज—बहुत अशी आस होती मनातें;
दुर्भाग्यें आमच्या ती सकळहि विलया आज गेली नृपाला!
राया! न्याया अकस्मात् तुजसि खळ मतिभ्रंश कोठूनि आला?
ह्या रायाच्याच चित्तीं बसुनि अखिलही दाखवाव्या खलीला,
बुद्धिभ्रंशा! तुला हा अनुचित कवणें सांग रे बोध केला?
कीं पृथ्वी धुंडितांही स्थळ उचित तुला दूसरें नाढळोनी,
तूं ह्या दुर्भाग्यशाली नृपतिस करिसी आपली राजधानी! २०

योग्य स्थान तुला खरोखर मतिभ्रंशा! मिळालें खरें—
कष्टावीण तुझे मनोरथ जिथें सारेहि झाले पुरे!
जे जे खेळ पुरा यथेच्छ करितां आले न कोठें तुला,
ते ते पूर्ण करोनि हेतु इकडे त्वां आपुला साधिला! २१

कांहींएक तवार्चनांत पडलें नाहींच येथें उणें;
जें चित्तीं धरिलें तुवां, मिळविलें तें इच्छिल्याच्या दुणें!
पूजा योग्य अशी परंतु तुजला झाली जिथें लाभती,
मूर्खा! घेउनि काय रे मिळविलें त्याचीच पूर्णाहुती?" २२

ऐसा आक्रोश सारे करित, महितला सिंचित स्वाश्रुपातें,
श्वासोच्छ्वासा वमीत, क्रमित हळुहळू थोर कष्टें पथातें,
खालीं घालोनि माना, विधिचरित मना नाणुनी, भाव नाना
चित्तीं कल्पीत जाती निघुनि, विसरुनी आपुल्या देहभाना! २३

भोगूनि क्लेश नाना, अमित जनमनां लोटुनी दुःखडोहीं,
सर्वांचीही निराशा करुनि, गति वरी शेवटीं निंद्य जो ही,
दुर्भाग्याचा असा हा अनुपम पुतळा ये जियेच्या कुशीला,—
पुत्रेच्छा स्वांतरीं ती अझुनि धरितसे काय राधा सुशीला? २४

कैसा त्या माउलीचा कविस परिसतां ये विलाप स्वकर्णीं ?
साह्यें मी कल्पनेच्या ह्मणुनि रसिक हो! त्यांतला लेश वर्णीं.
सारे शृंगारवीरादिक रस दुसरे आठ देवोनि अन्यां,
माझ्या वांट्यास कां हा करुणरसचि ती देतसे ब्रह्मकन्या! २५

जरी ही दुर्वार्ता सकल पुरभागीं पसरली,
तरी त्या राधेला विदित नच कोणा करवली;
परी जेव्हां पाहे निजसहचरी म्लानवदना,
करी बाधा तेव्हां सहजचि तिच्या संशय मना. २६

करी नाना तर्क, क्षणहि परि शांतीस न वरी;
विचारावें कोणा, हृदय तरि धैर्यास न धरी;
घरीं दारीं झाली मुदति जिकडे ती निरखिती,
तिथें सारे लोक प्रकट करितां मौन दिसती! २७

ऐशी साशंक—चित्तें विचरत असतां मंदिरीं सुंदरी ती,
कोणी तत्कर्णरंध्रीं कठिण करुनियां चित्त तें वृत्त ओती;
झंझावातें अकस्मात् कडकड कदली मोडुनीयां पडावी,
तैसी दुःखप्रकोपें महिवर पडती जाहली शीघ्र साध्वी! २८

स्तब्ध व्यापार झाले क्षणहि न लगतां सर्वही इंद्रियांचे !
देहाचें भान गेलें, कुठुनि मग तिथें शब्द येणार वाचे?
नाना सम्यक् प्रयत्नां करुनि परिजन श्रांत होऊनि जाती,
मूर्च्छावस्थेंत राधा करित परि घटी एक वास्तव्य होती! २९

मूर्च्छा सांवरुनी पुढें हळहळू पाहे सभोंतीं सती;
तों भासे सगळी कृतांतमयची विश्वंभरा तीस ती!
मूर्च्छा एक घडीभरी निजबळें ज्या आवरोनी धरी,
तो शोक प्रकट क्षणांत तिकडे स्वोग्रस्वरूपा करी. ३०

'देवा देवा!!' मुखानें ह्मणत महिवरी ती पुन्हा स्वांग टाकी,
'न्या कीं' सांगे समस्तां 'लवकरि मज न्या पंचगंगातटाकीं!
नाकीं जातें स्वपुत्रासह, मज न पुढें राहवे मृत्युलोकीं!
शोकीं कां पाडितां हो वसवुनि मज ह्या दुर्विधीच्या विपाकीं? ३१

हा हा!! तो भागला कीं मम तनय मला मारमारूनि हांका!
जाऊं द्याया मला कां अझुनि धरितसां स्वांतरीं व्यर्थ शंका?
स्वर्लोका जातसे तो त्यजुनि तनु कसा अंतरिक्षीं विलोका!
त्याची आकाशनौका गगनिं विचरतां दे पहा केविं झोंका! ३२

शोधायास मला मदीय जननी मागूनि ती येतसे—
वारंवार ह्मणूनि बाळ वळुनी मागें निरीक्षीतसे!
बाळा! थांब जरा! विमान इतक्या चाल्दं न द्यावें जवें!
मी आलेंच; तुझ्याशिवाय इकडे मातें कसें राहवें? ३३

हा! हा!! बाळ मिधूनि दूर जन हो गेलाच माझा पहा!
संकेतें मज थांबवूनि ह्मणतो—मागेंच आई रहा!
बाळा! काय अझूनि वेड तुजला सोडूनि गेलें नसे?
कां अद्यापि करावयास बघशी लोकांत माझें हंसें? ३४

हा दैवा! नवमास ज्यास दिधला वास स्वकीयोदरीं,
ज्याचे बाळपणीं लळे पुरवितां न त्रासलें स्वांतरीं,—
तो माझाच कुमार दीनवदनें मी प्रार्थितांही, मला
सोडोनि त्रिदशालयीं चिरसुखा भोगावया चालिला! ३५

किंवा येथेंच तूझी ह्मणति मति जया पाहतां क्षोभ पावे,
कैसें त्या मायबापांसह वसुनि तुला सौख्य नाकीं मिळावें?
या भावें काय नाकी गमन करिशि तूं त्यागुनी दुर्भगां या?
ह्या लोकींच्या विकारांसह सुरभुवनीं इच्छिशी केंवि जाया? ३६

धात्या! तूंच विचित्र, कां मग तुझी सृष्टी विचित्रा नसो?
हा तैसाच तुला न कां जन जसा ह्या मायलेकां हंसो?
बाळाच्या निजदर्शनेंच बहुधा जी सर्व रोगां हरी
माता, तीच कशी निजात्मजमतिभ्रंशप्रकोपा करी? ३७

ज्यांनीं वैद्यकशास्त्र सर्व पढुनी मोठ्या परीक्षा दिल्या,
ज्यांच्या यास्तव थोर थोर पदव्या नांवांपुढें जोडिल्या,—
वैद्यांचाहि अशा उपाय अगदीं नाहीं जिथें चालला,
बुद्धिभ्रंशमिषें असा गद तुला हा कोणता लागला? ३८

तूझ्या सम्यगुपाय काय नव्हता रोगावरी एकही?
बाळा! मानवधी परंतु अझुनी झाली न सर्वज्ञ ही!
किंवा सत्वचि औषधींत नुरलें संप्राप्त होतां कली,
गेलीं व्यर्थचि औषधें ह्मणुनि तीं जीं जीं तुला पाजिलीं! ३९

किंवा देतां अगद तुज तें सेविशी तूं न रागें,
त्रासानें ते ह्मणुनि सरले वैद्यही सर्व मागें?
यद्दोषाचा क्षय न करितां त्या प्रतोदाहि आला,
ऐसा कोणी तुजविण नसे अन्य जन्मास आला! ४०

रागाचे आग तूझ्या तुजसिंच तनया सर्व आले फळाला!
बुद्धीला भ्रंश झाला, सुगुण सकलही पावले दुर्गुणांला,
आशा गेल्या लयाला, प्रियजनविरहोद्वेग संप्राप्त झाला,
दुःखाचा पूर्ण आला अनुभव, मुकशी शेवटीं जीविताला! ४१

हा! हा!! थोर भिषग्वरीं कर महारोगास ज्या जोडिले,
त्यानें काय यश श्रमास असतें ह्या दुर्बळेच्या दिलें?
व्याधिग्रस्त परंतु बालक असे जों आपलें, तोंवरी
त्याचा त्याग करूनि केंवि जननी राहे सुखानें दुरी? ४२

तुजसह ह्मणुनी ही माय इच्छी रहाया,
शकति न जरि तूझ्या ती गदातें हराया,
अकरुण परि झालें दैवची आपलें कीं,
ह्मणुनिच पडली रे! तूट ह्या मायलेकीं! ४३

आङ्ग्लेवांचूनि ज्यांच्या भरतजनपदीं आज काडी न हाले,
त्याही आंग्लप्रभूंचे विफल सकलही ज्यापुढें यत्न झाले;
त्या रोगाचें कराया प्रशमन झटतां लोक हांसे मला हा;
हांसो! त्या काय ठावें अनुभवि जननी केंवि ती पुत्रमोहा? ४४

देशोदेशीं कुमारा! ह्मणुनि भटकलें सोडुनी स्त्रीस्वभावा;
केले ते मित्र, ज्यांचा परिचय न कधीं स्वप्नयोगेंहि व्हावा;
होते सेवावया जे अनुचित, न मनीं शंकलें सेवितां त्यां;
आली नाहीं तरीही तिळभर करुणा आपली त्या विधात्या! ४५

'तोडाया जी न शंके प्रथमचि ममतापाश, ती दुष्ट माता
'व्हाया स्वापत्यमोहाप्रति वश न कधीं योग्य होणार आतां—'
ह्यासाठीं व्यर्थ माझ्या करुनि सकलही प्रार्थना पुत्रराया!
येथें तैसेंच नाकीं त्यजुनि मज सुखे काय जासी रहाया? ४६

दुःखाचे मोठमोठे शिथिल न शकती घाव ज्यांतें कराया,
बाह्यत्यागें कशीं तीं शकतिल ममताबंधनें क्षीण व्हाया?
यत्न ब्रह्मादिकांचे विफल करुनियां टाकिले सर्व जेणें,
तो मायापाश जावा तुटुनि वद कसा स्त्रीजनांच्या प्रयत्नें? ४७

सुख तुजसि विशेषें प्राप्त हो, याच भावें
खचित तुज कुमारा! त्यागिलें म्यां स्वभावें;
विधिलिखित परंतु त्वत्सुखा आड आलें!
हर! हर!! अबलेचें ह्या तिथें काय चाले? ४८

'बाळा! बाळा!' मुखानें ह्मणत ह्मणत मी आज कोणास बाहें?
गेला स्वर्गास माझा सुत, अझुनि नसे काय ठावें मला हें?
वेड्याची होय माता, ह्मणुनि मजहि तें काय हो वेड लागे?
होतें तैसें तरी हें सहजचि पडतें सर्वही दुःख मागें! ४९

दुःखाचे डाग आतां सतत मम मना राहिले हे जडून;
आयुष्याचे करावे क्रमण दिवस म्यां शेष आतां रडून!
लोकीं ह्या दुर्भगेला निज मुख नलगे ह्यापुढें दाखवावें!
हा हा! आतां कसें म्यां सुतविरहविपत्सागरा ह्या तरावें? ५०

माता पाहुनि बालकास रडतां घेते जशी त्या कडे,
तैशी पावुनि जी भवार्त भजकां वारी त्वरें सांकडें—
ती कोल्हापुरवासिनी भगवती, माझी कुलस्वामिनी,
**अंबा** आज कुठें लपूनि बसली भक्तावना सोडुनी? ५१

महालक्ष्मी आई! तुजहि कृति ही काय रुचली?
तुझी माये! किंवा मतिच इकडे सर्व खचली?
अगे! होता माझा तुजवरिच सारा भरंवसा!
तरी ह्या रावेचा द्रव न लव आला तुज कसा? ५२

तुला होतीं कामें इतर अथवा फार जननी,
नसे माझी केली श्रवण ह्मणुनी त्वां विनवणी?
उणें किंवा माझ्याकडुनि तव पूजेंत पडलें,
मला त्वां त्या दोषास्तव ह्मणुनि हें शासन दिलें? ५३

दुरी नेला कीं मत्तनय तुजपासूनि, ह्मणुनी
वृथा गेलें तेथें सकल तव सामर्थ्य जननी?
कलीमध्यें किंवा कलहवश झाली वसुमती,
तुझी कुंठे सारी ह्मणुनि तिकडे सात्विक मती? ९४

केले जे म्यां नवस तुजला आजपर्यंत माते!
त्यांमध्यें कां सफल करितां एकही ये न तूतें?
देवी! तूझा अतुल महिमा वर्णिला जो पुराणीं,
त्याला ही त्वत्कृति न लघुता काय गे! सांग आणी? ९९

द्वारीं घालवुनी तुझ्या भगवती! गंधोदकाचे सडे,
म्यां पूजोनि सुवासिनी निज करें त्यां लेववीले चुडे;
त्याचें श्रेय भलें दिलें मज तवां! ऐसें जरी वंचिती
भक्तां देव, तरी असे मग दुजी त्यां कोणती गे गती? ९६

माये! ब्राह्मणभोजनें तव कृपाप्राप्त्यर्थ म्यां घातलीं;
दंपत्यांस शतावधि प्रतिदिनीं सौभाग्यदानें दिलीं;
देवी! वंदुनियां तुला सुरुचिरें माल्यें सदा वाहिलीं;
व्हावें त्वां सदये! दयार्द्र ह्मणुनी वाणें बहू वांटिलीं; ९७

अनुष्ठानें विप्रांकडुनि बहु तूझीं करविलीं;
शिरीं त्वन्नाथाच्या विमल जलधारा धरविली;
अनाथां पांथस्थां वसनधनदानें बहु दिलीं;
करोनीयां नाना व्रतनियम काया झिजविली. ९८

असे नाना यत्न स्वसुतगदशांत्यर्थ करुनी,
प्रसादाची तूझ्या बघत असतां वाट जननी!
कसा काळव्याळ प्रकटुनि अकस्मात् मम सुता
गिळोनी गेला तो पळुनि, तुजलाही न पुसतां! ५९

होवोनि श्रांत, किंवा विधिवरच तुह्मीं दैवतीं विश्वकार्यें
सारीं सोपूनि, निद्राव्रत पतकरिलें सांग गे! आज माये?
होतें पूर्वीच ऐसें विदित मज तरी एकव्या त्या विधीला
भावें सेवोनि जातें सहज तरुनियां आज दुःखोदधीला! ६०

मजवर विधे! देवांना त्या नये करितां दया,
अकरुण परी होसी तूंही अकारण कासया?
करिशि अथवा तूं कार्यातें न कारण पाहतां,
प्रकृतिच तुझी आहे ऐसी विलक्षण तत्वतां? ६१

विरह न मनोधामीं माझ्या कृशानु अमूर्त हा!
व्यथित करिती मातें ह्याच्या शिखा अतिदुःसहा!
नयनसलिलें जावें ह्यातें जरी शमवावया,
तरि न समजे कोठे राहे लपूनि तनूंत या! ६२

मम सुत झणीं दावा कोणी अहो जन हो मला!
त्वरित शमवा किंवा माझ्या कुणी विरहानला!
असतिल जरी दोन्ही कार्यें तुह्मांस असाध्य हीं,
मग सुख मला द्याया लोकीं उपाय न एकही! ६३

उठा जा! कोणींही मजजवळ यावें न इकडे!—
जरी कांहीं माझें हित न तुमच्यापासुनि घडे!
बसोनी एकांतीं रडुनि रडुनी मी झडकरी,
उरस्फोटें प्राणा पळविन तनूपासुनि दुरी! ६४

असशि कुमरा कोठें? ये ये! नको रुसुनी बसूं!
तुजविण तुझी माता देहीं धरूं न शके असू!
मजसि तनया! देईं देईं स्वदर्शन एकदा!
त्वदितर दिसे जी वस्तू ती गमे मज तापदा! ६५

कुठवर तुझें आतां मार्गप्रतीक्षण मी करूं?
भर तव वियोगोद्वेगाचा किती तरि सांवरूं?
न धरिं, न धरीं बाळा! कांहीं विषाद निजांतरीं!
शपथ तुजला माझी जाशी पळोनि जरी दुरी! ६६

बस बस मदंकीं वत्सा! त्वत्तनूप्रति हुंगितें,
वदनकमला प्रेमानंदें तुझ्या कुरवाळितें!
घडि घडि तुझे घेवोनीयां मुके नयनासवें
मजसि तनया! न्हाणूं दे रे त्वदंग महोत्सवें! ६७

न करिं न करीं बाळा आतां विलंब पलार्धही!
तुजविण सुता! भासे सारी क्षिती मज शून्य ही!
किति तरि तुला बाहूं! आतां पुरे; विरहज्वरें
व्यथित तनुला केलें माझ्या, न ती मज सांवरे!" ६८

विलपुनि वियोगोद्वेगानें अशी विविधपरी,
पुढति पडली **राधा** देवी अचेतन भूवरी!
गहिंवर गळां येवोनीयां अनावर दाटला!
रव न रसना काढी अश्रुप्रवाहहि खुंटला!· ६९

राधे! दु:सह पुत्रशोक कवणा साहेल हा गे? परी,
माये! तूंच विचार नीट करुनी ह्याचा पहा स्वांतरीं:
नाहीं एक जगीं तुझाच कुसवा झाला असा ओखटा;
दैवें पीडियल्या तुझ्यासम जगीं लक्षावधी चोखटा! ७०

ज्यांच्या आज जगीं तुह्मीच जपतां नामावली निर्मळा,
त्या नि:सीम पतिव्रतांसहि न जो पीडावया शंकला,
गांजाया अबलांस ह्या कलियुगीं तो भीत नाहीं विधी!—
हें आश्चर्य, असें कधीं न शकती कोणी ह्मणाया सुधी. ७१

पूर्वी दिक्पाळकांचे हरुनि सकलही प्रांत, केले जयांनीं
कर्ण स्वर्गांगनांचे बधिर निजयशोदुंदुभीच्या रवांनीं,
पुत्रश्रेष्ठांहि ऐशा प्रसवलि नव्हती काय लंकेशभार्या?
केले अल्पायु दैवें सकल! नुरविला एकही पिंड द्याया! ७२

गांधारी काय व्याली नव्हति सुतशता? वांचला कोण त्यांत?
त्या सर्वांचा कराया क्षय दिन अठराही न लावी कृतांत!
वेडे होऊनि नव्याण्णव यमसदना सांगती लोक गेले;
कोठें दैवें परी त्या विमलमति विकर्णास दीर्घायु केलें? ७३

रक्षाया निजभागिनेय शकता तो काय न श्रीहरी ?
ठावें त्यास परंतु निष्ठुर विधी झाला सुभद्रेवरी.
कृष्णा कृष्णकृपापराङ्मुख जरी स्वप्नीं न झाली तरी,
पांची पुत्र तिच्या समक्षच तिचे गेले कृतांतोदरीं ! ७४

बाई ! आठवुनी अतर्क्य चरितें ऐशीं विधीचीं, तुवां
जावें शोक करूनि दूर, तरुनी ह्या घोर दुःखार्णवा !
तूझी दीन दशा पहात बसतां संताप होतो मना,
प्रेषावी मज लागली ह्मणुनि ही अन्यत्र मत्कल्पना. ७५

कोठें धांवसि कल्पने ! क्षणभरी राहीं उभी ईकडे !
पाहूं दे अवलोकुनी मज जरा ह्या राजवाड्याकडे !
धात्या ! मंगलवाद्यघोष जिकडे व्हावा सदासर्वदा,
तेथें आळवितात आज सगळे शोकस्वरा दुःखदा ! ७६

हा ! हा ! हे मोठमोठे बहुत असुनिही स्तंभ ह्या सांवराया,
पाहे हा दुःखभारें लवुनि महिवरी कीं खालीं पडाया !
वाड्या ! दुर्दैव तूझें ह्मणुनि उपटुनी टाकिला मृत्युवातें
तो मुख्य स्तंभ तूझा !–बहुजन झटले धीर ज्या द्यावयातें. ७७

काळें रोगविमुक्त होउनि महाराज स्वराज्यासनीं,
व्हावा शीघ्र बिराजमान ह्मणुनी इच्छीत रात्रंदिनीं
जे काळ क्रमिती, उरीं झगटतां आतां निराशा सुरी–
तें हें सर्वहि राजमंडल बुडों पाहे विपत्सागरीं ! ७८

निजसखनिधनाचें तें असें वृत्त घोर
प्रतिनिधिहृदयातें होय वज्रप्रहार;
"शिव शिव! शिवराजा मित्र माझा निमाला!—"
ह्मणुनि वदत दुःखें हात लावी कपाळा. ७९

जो तूझ्या राज्यभारा धरुनि निजशिरीं श्रांत होवोनि राहे,
त्या त्वन्मित्रा नृपाळा! तव विरहविपद्भार हा केविं साहे?
आनंदाश्रूदकें जो निरखुनि तुजला न्हाणिता राज्यपट्टीं,
तेणें राया! कशी रे तुजवर करिजे आज शोकांबुवृष्टि? ८०

विकल सकल मंत्री होउनी म्लान वक्त्रें
ह्मणति—किति विधीचीं हीं विचित्रें चरित्रें!
करुनि विविध यत्न श्रांत झालों तरीही
फळ न अहह! झालें शेवटीं प्राप्त कांहीं! ८१

क्षम असुनि कराया आमची पूर्ण आशा,
अकरुण इतका कां तूंहि होशी परेशा!
उपजुनि शिववंशीं हा मतिभ्रष्ट व्हावा
शिवनृप, तुजला हें आवडे काय देवा! ८२

लवकरि उपचारें दुःख त्या राजयाचें
शमवुनि, निजपट्टीं त्यास आणावयाचें
अभिवचन जनां जें देत होतों, तयाचा
अनुभव उलटा हा काय भो! घ्यावयाचा! ८३

विवेकें शोकाच्या पुरुष भर तो क्षीण करिती,
परी शोकावर्ती पडुनि अबला केविं तरती?
जयीं त्यांच्या कानीं नृपनिधनवृत्तांत पडला,
तयीं वाटे त्यां तो निजहृदिं तडित्पात घडला! ८४

हाहाःकार प्रवर्ते क्षणहि न लगतां सर्व राणीवशांत,
स्वामीतें दासदासी स्मरुनि ढळढळां ढाळिती अश्रुपात!
होतां दुःखप्रकोपें व्यथित, पडतसे भूतळीं राजमाता!
गातों तीच्या विलापा, परि बहु रडतां भागलों मीच आतां. ८५

ज्याला राज्यपदीं सुखें विलसतां पाहूनियां, प्राक्कथा
लागावें विसराक्या हळु हळू बाई! तुझी सर्वथा,
तेणें दुःख दुणें करोनि तुमचें स्वर्गास जातें, असा
आणाया घडवूनि खेळ न कळे धाता प्रवर्ते कसा? ८६

बाई! तो शोक आतां करुनि परततो काय हो बाळ मागें?
कैसें त्या काळ आतां उगळिल—गिळिलें ज्या तयानेंच रागें?
गेला तो काळजीला त्यजुनि, परि सुरी काळिजा आपल्या ही
राहे झोंबून जी, ती उपटुनि सहसा टाकितां येत नाहीं! ८७

टेवावी लेखणी तों नरपतिवनिताक्रोश येऊनि कानीं
सांगे,—हा आयकाया उचित असुनि कां त्यागिजे गायकांनीं?
रागावो वाचकांचा सकल मजवरी वृंद, भागो गिरा हो,
तीचा तो शोक एक क्षणभर वदल्यावांचुनी मी न राहीं. ८८

अत्युग्र ग्रीष्मतापें करपुनि विपिनीं मालती जेवि जाई,
तैसाच क्षीण जीचा निजपतिविरहें काय पूर्वींच होई;
भार्या ती राजयाची श्रवण करुनियां दुःखकारी कथा ती,
भावी कर्णांत कोणी नकळत अपुल्या तैल संतप्त ओती. ८९

आक्रोश प्रांत सारा गजबजवुनि तो टाकिता होय तीचा;
सांगावें काय? धीर क्षणभर खचला माझियाही मतीचा.
बोले—"काळानळांत स्वतनुस हवितां प्राणनाथा कृपाळा!
दीनेचें ह्या तुह्मांला स्मरणच पडलें काय नाहीं नृपाळा! ९०

वर्षें फार अशीं विवाहसमया होऊनि गेलीं किती—
व्हावी यास्तव अप्रिय प्रियकरा माझी तुह्मां संगती?
देवाग्निद्विज यांसमक्ष धरिली राया तुह्मीं जी करीं,
ती कोणा न विचारितां त्यजितसां कैसी तुम्ही स्वांतुरी? ९१

राया! भोगुनि भोग काय अगदीं चित्तीं तुह्मी त्रासलां?
कीं संसार असार सर्वहि मना हा तूमच्या भासला?
किंवा दुर्गतिमूल राज्य ह्मणुनी आधींच त्यापासुनी
व्हावें दूर, असा तुम्हीं नृपवरा! निर्धार केला मनीं? ९२

अहा! बाल्यावस्था सरुनि नुकती यौवनकला
धरापाळा! येई, तंव गद शरीरीं प्रकटला;
शमेना जों तो तों खळ शमन मार्गे धडकला!
सुखें भोगायाला अवधि मग कोठूनि उरला? ९३

नका जाऊं! थां या! खचित करुनीयां विनवणी
तुम्हांला ही प्रार्थी नृपति! तुमची दीन रमणी;
कडू संसाराचे विषय असते केवळ, तरी
धणी नातुंडांचे मग न बसते खोंकत घरीं. ९४

तुह्मांऐसा लोकीं क्षितिपति मला नाथ असतां,
अनाथा मी व्हाया उचित तुमची काय वनिता?
अहो! माझें झालें रडुनि रडुनी शुष्क नरडें,
तरी कां हो प्रेमें क्षणभरि पहाना मजकडे? ९५

अहो कांता! आतां कुठवरि विनोदास करितां?
चला या! वाहों द्या सरल मम सौभाग्यसरिता!
जळो त्या काळाचें सदन! तिकडे जाउनी पुन्हा
न येती कोणीही परत जन या मर्त्यभुवना! ९६

विडा देतें घ्या हो! हंसत उघडा या मुख जरा!
रुसावें हें माझें व्रत, न तुमचें तें प्रियकरा!
कडू काढे प्याया सतत अथवा जी सवकली,
प्रिया! तांबूलाची रुचिच रसना ती विसरली? ९७

शिरा ज्या ग्यां स्वांकावरिच वसवावें नरपति!
कशा त्याला मांड्या कठिण यत्रनांच्या न खुपती?
प्रिया! झाली किंवा कठिण विधिरेषाच तुमची,
लया गेली सारी ह्मणुनि अगदीं मार्दव-रुचि? ९८

चुरावें म्यां राया! चरणयुग जें ह्या करतलें,
कसे मल्हारीचे खर कर तया आज रुचले ?
मतिभ्रंशें किंवा सकळ तुमचें भान हरिलें,
नृपा ! बाह्योपाधिस्मरण ह्मणुनी लेश नुरलें ? ९९

नाहीं आज, उद्यां तरी विधिवशें आरोग्य पावूनियां
स्वामी! याल निजालयास, ह्मणुनी जी वाट पाहे प्रिया;
कोठें आज तिला निराश करुनी प्राणेश्वरा! चाललां ?
या या! कोठवरी वियोग अझुनी देऊं पहातां मला ? १००

कांहीं अन्याय केले असतिल तुमचे म्यां जरी स्त्रीस्वभावें,
त्यांची याचीं क्षमा मी पदर पसरुनी, रुष्ट चित्तीं न व्हावें!
अन्यायन्यायवेत्त्यांकडुनि जरि चुका नित्य होती नृपाळा!
दोषांपासूनि राहूं शकतिल अगदीं दूर ह्या केविं बाळा? १

त्वरा द्याया मातें प्रथम तुमचें दर्शन करा,
पुढें न्यायान्याया निवडित बसावें प्रियकरा;
असे अन्यायाची मनुजभुवनीं नित्य वसती,
त्यजोनी ही जावें ह्मणुनी विबुधीं काय जगती ? २

नृपति! अझुनी कां हो याना ? असां कवण्या स्थळीं ?
भसित तुमची होते कांता पहा विरहानळीं;
विसर पडला बुद्धिभ्रंशें हिचा अथवा मनीं,
ह्मणुनि न दिसे प्राणेशा ही तुह्मां निजकामिनी ? ३

मर मर मतिभ्रंशा! माझ्या मनोरथमंदिरा
दहन करुनी केला काय स्वहेतु तुवां पुरा?
अहह! शमनक्रोधाग्नीला प्रशांत करावया
प्रियचि रुचला माझा कां रे! बळी तुज द्यावया? ४

अमित पडती प्राणी काळा! तुझ्या वदनीं सदा,
शमन न तरी पावे कैशी तुझी शमना! क्षुधा?
गिळुनि सकळां कां रे होशी कृतार्थ न एकदां!
पुढति ह्मणजे जीवाला ह्या शिवेल न आपदा! ५

अहो! धांवा धांवा! मज न कळतां काळ कुटिलें
बळें सौभाग्याचें सकल मम भांडार लुटिलें;
धरा! मारा ह्याला! करुनि मुख काळें पळतसे!
उपेक्षाया आतां उचित अगदीं हा खळ नसे! ६

गेला! गेला!! निघुनि न दिसे चोर तो दूर गेला!
नेला माझा प्रियकर तयें चोरुनी सत्य नेला!
झाला माझा खचित सगळा व्यर्थ संसार झाला!
दुर्दैवानें मजवरि पुरा घातला आज घाला! ७

**आनंदी** नाम माझें असुनि मजवरि हा करोनि प्रकोप
माझा कां मालवीशी कपटपटुविधे! आज आनंददीप?
ह्या वैधव्यांधकारीं ढकलुनि कपटें, जन्मदुःखी मला या
**आनंदीला** कशाला करुनि बसविसी? निर्दया भागधेया! ८

कसें अशिव हें मला **शिव** असोनि भर्ता शिवे ?
सहे भजक दुःख हें तुज कसें कळेना **शिवे** ?
कशास अथवा रुसूं तुजवरी पुरारिप्रिये !—
जरी फिरवितां तुह्मां लिखित त्या विधीचें नये ? ९

पराक्रम करावया स्थळ दुजें मिळेना तुला,
प्रसंग अबलेवरी ह्मणुनि काय हा आणिला ?
विधे ! तुज रुचोत ह्या परम निंद्य तूझ्या कृती !
परंतु निरखूनि त्यां विबुध फार संतापती." १० १०

स्वकांतविरहार्णवीं पडुनि शेवटीं जी बुडे,
विलाप करुनी असा विकल होउनी ती पडे.
व्यथा कविमनास ही व्यथित फार तीची करी,
त्यजोनि **करवीर** ही म्हणुनि चालली वैखरी. ११

दुर्भाग्यास तुझ्या खरोखर नसे कोल्हापुरा ! पार रे,
तारुण्यींच ह्मणूनि दोन गिळिले काळे तुझे मोहरे !
वेडा हा ठरला: परंतु अझुनी गातात ज्याच्या गुणां,
**राजाराम**हि तो तुला न पचला कां सांग रे शाहणा ? १२

मर ! मर !! मर काळा !!! कां जगत्सूत्रधारें
अमर तुजचि केलें खावया लोक सारे ?
छळुनि निरपराधी आज कोल्हापुरा या,
त्रिभुवनि पुरुषार्थी पाहशी काय व्हाया ? १३

अनुचित पुरुषार्थें लोकविख्यात होती
अगणित यमराया ! ह्या जगीं मर्त्यमूर्ति!
ह्मणुनि तुजहि तैसी वासना काय व्हावी ?
प्रकृति परि न तूझी मानवी, होय दैवी.　　　　१४

जो व्यापुनी स्थिरचरां सकलांस राहे,
ज्याचा पराक्रम जगत्रय कांपवी हें,
काळा ! असा सकलसौख्यविनाशहेतु
आहेस कोण अजरामर मोहरा तूं ?　　　　१५

जो गर्जोनि दणाणवी घनरवें सारें महाराष्ट्र हें,
पुण्यारण्यहरीस त्या कृति कशी काळा! तुझी ही सहे?
कीं जो व्यर्थ शिला विदारित बसे कुंभिभ्रमें, तो हरि
भ्रांतीनें नखरप्रहार करितो कोणा त्वदन्यावरी ?　　१६

मराठ्यांच्या राया हरुनि यम आजी पळतसे,
**मराठा** हा कां हो अझुनिहि तरी स्वस्थचि बसे?
अरे ! ज्यांच्या मारें भिवविशि सदा तूं रिपुमनां,
न त्या वाग्बाणीं कां व्यथित करिशी आज शमना? १७

झालें दैवचि वांकडें ह्मणुनि जें शोकांधकारीं बुडे,
कोणाचाच कसा प्रकाश न महाराष्ट्रावरी त्या पडे?
किंवा कालवशें करोनि **अरुणा** पंगुत्व आल्यामुळें,
**मित्रा**ची गति कुंठतां, द्युति दुरी **इंद्रा**दिकांची पळे? १८

विधे ! अन्योपायें क्षितिपति न तो काय मरता,
ह्मणोनी संतापें दहन करिशी तत्तनुलता ?
क्षणें फाडाया तूं क्षम असुनि लोकत्रयपटा,
वृथा कां ही केली खटपट विपन्नाटकनटा ! १९

आरोपव्यसनांत कां बुडविशी त्या माधवाला वृथा ?
कां रे ! भोगविशी स्वदेशभजकां कारागृहाची व्यथा ?
होते खेळ तुझ्या मनीं घडवुनी ते आणिले त्वां; परी,
व्हावें रुष्ट तुवां असें न पुढती कोल्हापुराच्या वरी ! १२०

वेडे काय जगांत आज असती थोडे ? अहाहा ! परी,
राया ! वेड तुझेंच सर्वहि महाराष्ट्रास वेडें करी;
बुद्धिभ्रंशनिधीस त्या विधिवशे उल्लंघिसी तूं **शिवा !**
आह्मी केवि तरूं परंतु न कळे ह्या घोर शोकार्णवा ! २१

जो त्या वैभवमंदिराप्रति बळें म्लेंच्छांचिया कांपवी,
ज्याचे हर्षभरें जगात अझुनी गाती पवाडे कवी;
सत्तावीस पिढ्यांत दुःख असलें त्याच्या न यावें पुन्हा,
आहे संतत आमची तव पदीं हीच प्रभो प्रार्थना ! २२

त्वरे दुःखाचा ह्या विसर करवीरा ! तुज घडो !
पुढें आयुष्याची नृपतिस तुझ्या वाण न पडो !
सदा आणोनीयां तव विभवसिंधूस भरती,
सुखी ठेवो सर्वा सुखसदन लोकत्रयपती ! २३

तद्भाळीं अशिवाशिवाय दुसरें धाता लिहीना, तरी
तो येवोनि **शिवान्वयीं** शिवपदा पावे **शिवाख्या** वरी;
आहे यास्तव शोचनीय **शिव** जो सर्वां मराठ्यांप्रती
दुःखाश्रूंसह मी समर्पण करीं ही तत्स्मृतीला कृती. १२४



## रिपनवियोग.



दुष्काळव्याळ[1] जीच्या सकळ अवयवां वेढुनी तीन वर्षे,
दुर्भिक्ष्यक्ष्वेडवर्षे[2] व्यथित करितसे जीस दुःखप्रकर्षे;
दुःखें होती अशाही तळमळत तरी व्यर्थ पन्नास लक्षां
लावोनी खार, जीच्याकडुनि करविला "बादशाही तमाशा;" १
दुष्काळांत निजात्मजोदरदरी[3]माझारि जो चेतला,
आला शांतवितां क्षुधाग्निहि न तो मोठ्या प्रयत्नें जिला;

१. दुष्काळरूप सर्प. २. दुर्भिक्ष्य हेच विष, त्याच्या वर्षावाने.
३. निज–आत्मज–उदर–दरी.

ह्या दुःखांतहि वीस कोट रुपये मानोनि जैसे खडे,
स्फुंदस्फुंदत घोर **खैबरदरी** जीला भरावी पडे; २

रणांतीं उत्पन्नावर कर जियेच्या बसवुनी,
न यावें आक्रोशें रुदन करितां तीस ह्मणुनी,
क्षणामध्यें लोकोत्तर नियमसूत्रीं जखडुनी,
मुखें आधीं जीचीं सकल धरिलीं बंद करुनी; ३

मूकस्तंभापरि विचरतां दुःख ठाणें न सोडी,
बोलावें तों मुख उघडितां कायदा दांत पाडी,
जातां स्वामीजवळ "परता" सांगती द्वारपाळ—
"जा स्वामीला विनति परिसाया नसे आज वेळ;" ४

अशी सतत आर्य हो! बहुत ताप जी पावली,
तया **भरत**भूवरी करुनियां कृपासावली
जया त्वरित पाठवी **विजयिनी** तिच्या रक्षणा,
सखा **रिपन** आज तो त्यजुनि चालला आपणां! ५

**भरत**भुवनीं येत्रोनीयां प्रजाजनहृत्पटीं
उठवुनि ठसा स्वप्रेमाचा खरोखर शेवटीं,
प्रियसख तुझा जातो **ग्ल्याडस्टना**! परतूनि हा;
विरह परि ह्या **आर्यां** त्याचा सदा क्षणवील—हा! ६

वर्षें न पांचहि पुरीं भरलीं; परंतु
तूझे करोनि तितक्यांतचि सार्थ हेतू,

१. वर्तमानपत्रे. २. अशी—ह्मणजे—वर चार श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें.

हा चालला **रिपन** आज तुझ्या यशाचे
झेंडे अखंड **विजये!** उभवूनि साचे! ७

त्यजुनि अनयभीतें ज्यांस वाटे करावें
सकल **भरतभू**चें राज्य खड्गप्रभावें,
वडबडत तयांतें ठेवुनी, तन्मुखश्री—
सह **रिपन** हरोनी चालला हा जयश्री! ८

परम भूषण केवळ आपणां
विनयतेजचि होय, न मीपणा:
विदित आंग्लजनां करुनी असें
**रिपन** हा यश घेउनि जातसे! ९

धैर्य, शौर्य, भुजवीर्य न ज्यांतें
जिंकिती, हरुनि तीं जनचित्तें,
**भारतीं** वसवुनी निजकीर्ति
चालला **रिपन** सद्गुणमूर्ति! १०

**काळ्यागोऱ्यां** सांगतो भेद तोडा—
ह्यासाठीं ज्या मानिती **गौर** वेडा,
तो हा आजी आपलें वेड लोकां
लावूनीयां जात आहे विलोका! ११

हा नसे उचित राज्य कराया—
जे असे वरळती जन वायां,
राजनीति शिकवूनि तयांला
जावया **रिपन** तोच निघाला! १२

**आर्य**प्रसूदरि करोनि महोपकारा
हा नागवील निजबांधववृंद सारा—
ऐशा निरर्थक भया धरुनी जयांनीं
कोलाहला करुनि दूपविली स्ववाणी; १३

झांकावया सकल दुश्चरितां तयांच्या
होतील कारण कृती चिरकाळ ज्याच्या,
तो वाढवूनि निजदेशयशोधनाला
हा जावया **रिपन** आज पहा निघाला ! १४

धर्माभिमानवश होउनि, राज्यसत्ता
येतां करीं इतरधर्ममतानुरक्तां
पीडील हा करुनियां अनया सदांही—
कंडी अशी उठविली पहिलीच ज्यांहीं; १५

न्यायस्वरूप कळवूनि तयांस आधीं,
अन्यायमार्ग मग जो गुणधी निरोधी,
तो न्यायमूर्ति **विजये !** तव दर्शनातें
हा चालला वरुनि **भारत**मित्रनातें ! १६

एकाहुनी सरस एक गुणप्रभेनें
**ग्ल्याडस्टना**दिक अनेक मनुष्यरत्नें
तुझ्या असोनि जवळी, इतक्यांत कां गे
नेतेस हें **रिपन**रत्नहि आज मागें ? १७

जसजसें वय वाढत जातसे,
तसतसा अधिकाधिक होतसे
प्रबळ लोभहि मानवमानसीं;
तदनुरूपचि वर्तशि तूं कशी ? १८

अन्य लोक असतात भिकारी,
लोभ हा ह्मणुनि त्यां हितकारी;
**इंदिरा** असिसि तूंच निजांगें,
पाहिजे कृपणता तुज कां गे ? १९

आधीं दावुनि, लोभ लावुनि, गळां घालूनि रत्नावली,
बाळाला ठकवूनि काढुनि पुन्हा घेते जशी मावली;
तैसा घालुनियां गळां नरमणी हा **आर्य**बाळांचिया
नेसी ओढुनि हौसही पुरविली नाहींच तों कासया ? २०

अलंकृत करावया उचित तूंच ह्या भूतला,
अलंकरण पाहिजे मग दुजें कशाला तुला ?
हतप्रभ न जाहला तव यश:प्रकाशामुळें
असा मणि जगांत ह्या खचित एकही नाढळे ! २१

मणीच नसती तुझ्याजवळ हें ह्मणावें, तरी
तुला सतत सेविती नवनिधी गुलामापरी;
ह्मणों प्रिय मण्यांहुनी नरमणी तुला वाटती,
तरी तुजसभोंवतीं चमकतात तेही किती ! २२

झाली प्राप्त जरा, न लेश उरलें सामर्थ्य देहीं, तरी
राज्याची धरुनी धुरी निजशिरीं जो देशसेवा करी,
वार्द्धक्यांतहि जो प्रदीप्त रविसा बुद्धिप्रकाशें दिसे,
तो **ग्ल्याडस्टन** हा अखंड रतला सेवेंत तूझ्या असे! २३

जडींही चांचल्य प्रकट चपला जेविं करिते,
तसी ज्याची वाणी जडजनमनोजाड्य हरिते;
सदा आनंदें जो परहित कराया झटतसे,
महावक्ता तोही तुजजवळ हा **ब्राइट** असे! २४

अचक्षु परि डोळसाहुनिहि फार ज्याचा घडे
जनांस उपयोग, ये बिकट मार्ग जेव्हां पुढें;
ह्मणे मतिस जो सदा—'रत परोपकारीं [illegible]'
असे **विजयिनी** तुझ्याजवळ तोहि **फासेट** हा! २५

**हार्दिंग्तना**दि दुसरींहि अशीं निधानें
देतात गौरव तुला निजसन्निधानें;
विद्याविभूषित तुझी सगळी प्रजाही
सेवेंत संतत तुझ्या अनुरक्त राही. २६

आज्ञेंत राहुनि तुझ्या तुज सौख्य द्यावें—
कर्तव्य ह्याविण जयां दुसरें न ठावें,
ऐसे सुपुत्र जवळी असतांहि कां गे
नेतेस हा **रिपन**ही इतक्यांत मागें? २७

वर्षें पांच पुढेंहि **आर्य**भुवनीं ठेवूनि घ्याया जया
भावें **आर्य**जनीं तुला विनविलें साकांक्ष होऊनियां,
तो न्यावा इतक्यांतचि प्रियसखा त्वां आमचा स्वालया—
औदार्यास तुझ्या कशी **विजयिनी** ही शोभवील क्रिया? २८

किंवा ह्या विबुधास निंदुनि वृथा आनंद जे मानिती,
द्याया स्वार्थपटूंस त्या सुख सदा केली तुवां ही कृती?
न्यायान्यायविचार सोडुनि परी तूं निंदकांच्या भयें
अन्याया करिशील—ही न सदये! शंकाच आह्मांस ये. २९

दुर्दैवास्तव आमच्याच अथवा आह्मां त्यजावें असें
वाटे त्यासच काय, यास्तव पडे तूतें करावें तसें?
कांहीं त्या विबुधास कारण असो किंवा नसो जावया,
तो जाणार खरोखर प्रियसखा आह्मांस सोडोनियां! ३०

करुनि करुणा आह्मां **आर्यां**वरी सदयाग्रणे!
**भरत**भुवनीं जाया आज्ञा दिली तुजला जिणें,
पुरवुनि सख्या जाशी तीची यशोधनलालसा;
विसर पडला ह्या **आर्यां**चा परंतु तुला कसा? ३१

अहा ज्यांच्या आंगीं खिळुनि बसतां आळस बळें,
कळा त्या लक्ष्मीची सकळहि जयां सोडुनि पळे,
जयांच्या दैन्यातें बघुनि मन तूझें कळवळे,
कसा त्या **आर्यां**चा तुजहि रुचला त्याग नकळे! ३२

अन्योन्यांतचि. भांडती करुनियां बंधुत्व एकीकडे,
त्या पापेंच परावलंबन—बिडी पायीं जयांच्या पडे;
ज्यांचे बंध हळूहळू शिथिलता पावोत ह्या कारणें
केले कष्ट तुवां, तयां त्यजुनि कां जाशी उदाराग्रणे ? ३३

ज्यांना जात्यभिमान फार रुचला देशाभिमानाहुनी,
देशप्रीति ह्मणून लेश उरली नाहींच ज्यांच्या मनीं,
ज्यांचें ऐक्य करावयास रचिल्या त्वां युक्ति नानाविधा,
कां रे **आर्य**जनांस त्या त्यजुनियां जातोसि आजी बुधा? ३४

वारवार 'रहा' ह्मणूनि तुजला जे आदरें सांगती,
भिक्षा एक तुझीच जे विनवुनी **राज्ञीस** त्या मागती,
ज्यांच्या आप्तजनीं स्वयें गणवुनी त्वां घेतलें आपणा,
होसी **आर्य**जनांस त्या प्रियसख्या कां आज तूं पाहुणा ? ३५

'आह्मी जिंकुनियां जनां शिकवितों राज्यें कराया तयां—'
ऐसें बोलुनि मात्र बांधव तुझे दावीत होते जयां,
देशीं प्राप्त परंतु तूंच करुनी राज्याधिकारांश ज्यां,
केल्या आज निराश कां प्रियसख्या त्या सर्व **आर्य**प्रजा ? ३६

जी अज्ञानघनांधकार पळवी **यूरोप**खंडांतुनी
विद्या निष्प्रभ तीच **आर्य**भुवनीं कां राहिली होउनी—
ह्याचा पूर्ण विचार तूं करविसी ज्ञानी कराया जयां,
कां अज्ञानदशेंत सोडुनि सख्या जातोस आजी तयां ? ३७

त्वां यत्प्राणधनावनार्थ दिधला फांटा दुखणीरणा,
मिस्रीयुद्धमखींहि तूं विसरला नाहींस ज्या निर्धनां,
ज्यांना त्रास पडेल यास्तव तुवां आगेस्करां[१] अप्रियां
नाहीं दंडियलें, त्यजोनि सखया कां आज जाशी तयां ? ३८

भरें दारिद्याच्या लवुनि पडले केवळ तरी
जयां घ्यावें लागे विविधकरभारां निजशिरीं,
अशा वेळीं त्वां ज्यां अभयकर येऊनि दिधला,
तया आर्यांचा कां उचित गमला त्याग तुजला ? ३९

संकल्पाच्या घणानें दृढतर कुलपें फोडुनी संशयाचीं,
तोडोनी धैर्यटंकें बिकट अरगला कायद्याच्या भयाची—
वेत्रद्वारें जयांचीं उघडिलिं असती त्वां उदारावतंसा,
त्या आर्यांचा तुला हा उचित निजमनीं वाटला त्याग कैसा? ४०

होता आजवरी कलंक जडला जो न्यायशास्त्रावरी
त्यातें क्षाळुनि टाकितां छळ तुझा केला खळांनीं, तरी
अंतीं शत्रुजनांहि दावुनि दया त्वां न्याय ज्यांना दिला,
जावें सोडुनियां तयांस रुचलें हें कां दयाळा तुला ? ०१

वर्षे पांच इथें न वास घडला तों काय ती माउली
याया आर्यजनांस[२] सोडुनि तुला आज्ञापिती जाहली ?
पावे सौख्य परंतु जी गुणवती स्वीयप्रजांच्या सुखें,
ती आम्हां दुखवूनि नेइल तुला कैसें वदूं हें मुखें ? ४२

---

१. आगळीक करणाऱ्या. २. वर्तमानपत्रें.

कीं आम्हांस्तव, जी स्वदेशभजका! त्वां जन्मभू सोडिली,
तीनें सर्वहि चित्तवृत्ति तिकडे आहे तुझी ओढिली?
हें स्वाभाविकची; परंतु तितक्यासाठींच सत्यव्रता!
वाटेना त्यजिशील तूं प्रियसख्या ह्या आपल्या आश्रितां! ४३

किंवा सर्वहि मित्रमंडळ तुझें तूझ्या वियोगें सदा
वेडें होउनि सांगतें तुज—'सख्या ये ये घरा एकदा!'
त्वन्मित्रांत परंतु एकहि तरी आहे असा काय रे—
जो स्वार्थार्थ परोपकारघटका सांगेल 'मागें सरें? ४४

कीं सांगे तुजला तुझी प्रियतमा—'उष्णप्रदेशांत या
'होतो ताप अपार यास्तव चला प्राणप्रिया स्वालया!'
औदार्याब्धि उचंबळे परि तुझा ज्या चंद्रिकेच्या गुणें,
ती साध्वी न करील बोध सहसा तूतें असा सन्मणे! ४५

किंवा त्वन्मन जें अखंड धुतलें स्वातंत्र्यगंगाजळें,
त्याला लागुनि पारतंत्र्यमळ ह्या भूमींतला तें मळे?
होती शुद्ध परंतु थोर मळधी संगें जयाच्या सख्या,
कैसा सांग जडेल रे मळ तया शुद्धा तुझ्यासारख्या? ४६

किंवा कार्य करावयासि निघसी जें जें सख्या चांगलें,
येतें विघ्न तयांत यास्तव तुला जाणें बरें वाटलें?
ज्यानें विघ्नभयें परी त्यजियली आरंभिलेली कृती,
ऐसा नंदन आंग्लभू प्रसवली आहे तरी काय ती? ४७

किंवा निंदक निंदितात तुजला सोडोनि लज्जाभया,
तेणें कीर्ति तुझी मळेल ह्मणुनी तूं पाहसी जावया?
धीरोदात्त परी तुझ्यासम जगीं जे मोहरे जन्मती,
तच्चित्तास विकार होय न कधीं ऐकूनि निंदास्तुती! ४८

कीं झाले उपकार ज्यांवरि तुझे त्यांमाजि कोणी तुला
आलें आढळुनी कृतघ्न, ह्मणुनी त्वां देश हा सोडिला?
स्वप्नींही न परंतु जे विसरती तूझ्या उदारा कृती
त्या **आर्यां**त नसेल एकहि असा निःसंशयें दुर्मती! ४९

कीं जे हेतु तुझ्या मनांत असती सिद्धीस ते न्यावया
आहे हा प्रतिकूळ काळ, ह्मणुनी तूं इच्छिसी जावया?
काळाच्याहि बळा परंतु हरिती विद्याकळा ज्यांचिया,
ते पाश्चात्य तुह्मी न व्हाल वश ह्या आधारहीना भया! ५०

किंवा मित्र तुझा उदारवर तो **बेरिंग** गेला असे,
जाशी यास्तव तूंहि, कीं तुज तसा साह्यास कोणी नसे?
तो **इल्बर्ट** उदार धीर इकडे नाहींच कीं काय हा?
आहे **हंटर** आर्य **फर्ग्युसन**ही तूझ्या सहाया पहा! ५१

कीं देहप्रकृती तुझी बिघडली आहे इथें राहुनी,
ह्यासाठीं निरुपाय होउनि सत्वर जातोसि तूं येथुनी?
दुर्दैवा! पगडा तुझाच बसला आह्मांवरी शेवटीं!
अस्मत्संकटनाशकास ह्मणुनी त्वां लोटिलें संकटीं! ५२

जरी खचित ह्यामुळें तुज असें करावें पडे,
नको मग नको वसूं पळहि एक तूं ईकडे!
मिळेल तुज ज्या स्थळीं सुख तिथें सख्या! जा सुखें!
तुझ्याच असती सुखीं सकळ आमचींही सुखें! ९३

वळे न रसना सख्या! तुजसि जा ह्मणाया जरी,
प्रसंगवश होउनी तुज निरोप देतों तरी;
निरोप दिधला खरा, निरवधी नसे तो परी;
पुन्हा परत येउनी सुखवि **आर्यभू** लौकरी! ९४

नाहीं शेवटचा निरोप सदया! आह्मीं तुला हा दिला;
तूझा वास पुन्हाहि आर्यभुवनीं ह्या पाहिजे जाहला!
केव्हां सांग पुन्हा त्वदागमन ह्या आर्यप्रदेशीं घडे?
डोळे लावुनि वाट पाहत वसूं तूझी समुद्राकडे! ९५

ये ये!—हेंच पुनः पुन्हा कथितसों आह्मी तुला आर्जवें!
तो **बेरिंग** सखाहि आण पुढती येशील तेव्हां सवें!
हे औदार्यदयाघना! न इकडे येशी पुन्हा तूं, तरी
त्वां जे लावियले इथें तरु कशीं यावीं फळें त्यांवरी? ९६

नाहीं येववलें पुन्हा तुज तरी येऊं नको रे! परी
ह्या **आर्यां**वर लोभ संतत जसा केलास तैसा करीं!
यावें त्वां अथवा न **आर्य**भुवनीं, कीर्तिस्वरूपें तुला
आह्मी ठेवुनि घेतलें! विदित हें हो सर्वही भूतला! ९७

हो हो आठवलें बरें प्रियसख्या! जातांच आधीं त्वरें
त्या देवीस विनंति एक इतकी तूं आमची सांग रे!
कीं—'ह्या आर्यजनांस तूंच असती मातापिता माउली;
'ह्यांपासूनि दुरी न हो विजयिनी! तूझी कृपासावली!' ५८

हे अस्मत्प्रणिपातही कळवुनी ग्ल्याडस्टनाद्याखिलां,
सांगें—'भारतलोकवृंद तुमचा आहे ऋणी जाहला;
'ठेवा लोभ असाच नित्य, ह्मणजे आटून जाईल तो
'द्वैतांभोधि परस्परांमधुनियां अद्यापि जो वाहतो!' ५९

इंग्लंदेसहि हेंच सांग—अथवा सांगेल कोणी तरी—
कीं सत्पुत्र असेच धाड सदये! ह्या आर्यभूमीतरी!
आह्मी प्रेमजलांत न्हाणुनि तयां, लावूं यशाची उटी;
संसर्गें मग गंधवोत तुजला ते आपल्या शेवटीं! ६०

स्वप्नींही न परोपकारविषयीं वैराग्य ज्यां आवडे,
औदार्येंच यशोधना मिळवितां संतोष ज्यांना घडे;
ते येवोनि समोर इंग्लिश—तुझी जातांच तेथें तरी—
सत्कारूनि करीत वाद्यगजरा नेवोत तूतें घरीं! ६१

वायो, मंद वहा! जरा स्थिर तुझी वृष्टीहि मेघा करीं!
सिंधो तूं खवळूं नको! दिनकरा तीव्रा तपा आवरीं!
हेमंता! स्थळ दे मधूस! पिकहो! गा आळवोनी सुरा!
जाऊं द्या सुखरूप आर्य रिपना सानंद त्याच्या घरा! ६२

निंदा निंदकहो! निरंतर तुह्मी त्या वंदनीया सुखें!
आह्मीं तद्यश गावया उघडिलीं चोवीस कोटी मुखें!

कां जल्पूनि निजाननें शिणवितां? आह्मी असंख्य ध्वनी
उच्चारून दणाणवूं वनरवें ही सर्वही मेदिनी! ६३

त्याला त्रास दिला, तथापि तुमचें कल्याणची जो करी,
कां हो दूपवितां—तयास छलुनी—वाग्देवतेला तरी?
जो साधू छळिलाहि तो तरि सदा दावी दया दुर्जनीं,
छेत्त्यालाहि सुगंध चंदन जसा दे घावही साहुनी! ६४

ते कोणीहि असोत आर्यभुवनीं ह्या जन्मले जे परी
त्या सर्वांस ह्मणून आर्य, विनवीं मी जोडिलेल्या करीं:
व्हा व्हा शीघ्र पुढें! तुह्मीं ह्मणविला जो आपला सोयरा,
तो हा सद्गुणभाजन प्रियसखा जाया निघाला घरा! ६५

ज्याचे **सुवर्ण**भुवनीं घडतांच येणें,
दुष्काळदुःख उठवी इकडूनि ठाणें;
तो आज **आर्य**जनहो! त्यजुनी तुह्मांला,
हा चालला प्रियसखा तुमचा घराला! ६६

येतांच **आर्य**भुवनांत जया उदारे
मोहूनियां निजगुणें **अफगाण** सारे
अत्यंत घोर रणयज्ञहि शांत केला,
तो चालला प्रियसखा तुमचा घराला! ६७

ज्याचा महींत तुमच्या पडतांच पाय,
अन्यायही हळुहळू सरवीत पाय
जाया निघे सभय दूर दिगंतराला—
तो चालला प्रियसखा तुमचा घराला! ६८

जें होय दुष्कर चमूंसहि भूभुजांच्या
प्रेमेंच तें सहज कार्य घडे प्रजांच्या—
हें चांगलें शिकवुनी निजबांधवांला,
हा चालला प्रियसखा तुमचा घराला ! ६९

मंथोनियां गहन संशयसिंधुपात्रा,
देऊनियां नयसुधा सम शत्रुमित्रां,
जो पी स्वयें खलदुरुक्तिहलाहलाला,
तो चालला प्रियसखा तुमचा घराला ! ७०

'माझ्या कृती निरखुनी मज ओळखा'—हें
जेणें तुह्मांस कथिले पहिलेंच आहे,
बोलापरी करुनि संतत वर्तनाला
तो चालला प्रियसखा तुमचा घराला ! ७१

**राणी**च्या राजरस्त्यावर धनपतिची जी असे तीच सत्ता
रंकाचीही असे—हें कळवुनि सकळ स्वाधिकारप्रमत्तां,
सौजन्यें आपल्या जो सुजन ह्मणविता सर्व **आंग्लां**हि झाला,
तो जातो **आर्य**हो हा प्रियसख तुमचा सोडुनीयां तुह्मांला ! ७२

व्हा व्हा पुढें ! बसुनि कां सदनीं रहातां ?
जाईल तो खचित जाइल मित्र आतां !
या या ! चला सकल बांधवहो ! चला या !
त्या आपल्या प्रियसख्यास निरोप द्याया ! ७३

सूत्रें असोनि तुमचीं स्वकरीं, तुह्मांला
मित्रापरी सतत वर्तविता जहाला

जो, त्या स्वमित्र **रिपना**प्रति बोळवाया
या हो तुह्मीहि **नरनायक**हो! चला या! ७४

अहो **विजयिनी**यशोध्वज उभारुनी, आपला
सखा **रिपन आर्य**हो! खचित आज हा चालला!
असे ह्मणुनि आपणां उचित त्यास सत्कारणें—
घरोघर पथोपथीं उभवुनी गुढ्यातोरणें! ७५

निंदावृष्टि करीत दुर्जन जरी होते सदा त्यावरी,
सद्भावें उपकारवृष्टिच तरी **आर्यां**वरी जो करी,
तो औदार्यदयाब्द जात असतां भार्येसह स्वालया
हर्षें त्यावर पुष्पवृष्टि करुनी या बोळवूं या तया! ७६

राहो ईशकृपा तुझ्यावर तुझ्या भार्येवरीही सदा!
आयुर्वृद्धि असो! तुह्मांस न शिवो स्वप्नांतही आपदा!
औदार्यांबुनिधीस पूर तुमच्या ऐसाच येवो सदा!
कीर्तिश्री चवरी तुह्मांवर सदा ढाळूनि पावो मुदा! ७७

ज्या औदार्यघनें प्रजाजनशिखी[1] नाचावया लाविले,
ज्याचे सद्गुण नित्य वार्तिकपिकीं[2] अत्युत्सवें गाइले,
जेणें न्यायलतेस **भारत**वनीं येवोनियां सिंचिलें,
सत्कारोत तया दयार्द्र **रिपना** हीं मोगऱ्याचीं फुलें! ७८

१. प्रजाजन हेच मोर. २. वर्तमानपत्रकाररूपी कोकिलांनीं.

## हेन्री फॉसेट.



जन्म .........१८३३.   मृत्यु, ६ नोव्हेंबर १८८४.

वाग्देवी करितेस काय? फिरसी स्वच्छंद कोणीकडे?
ठावें काय तुला न मित्रनिधनें ही **आर्यमाता** रडे?
ये ये! आर्यजनांसह क्षणभरी ढाळीत नेत्रोदका
शोचूं आपण आज तो उभयतां **फॉसेट**नामा सखा! १

आला वीट तुलाच काय रडतां? मातेंहि आला असे;
माये! सांग परंतु तूंच रडल्यावांचून चाले कसें?
सारे लोक करीत शोक असतां राहीन मौनें तरी,
पाषाणाहुनिही कठोर असलों मी पाहिजे त्यांतरीं! २

अगे! गेला जेव्हां विबुधवर तो कालनिलयीं,
करावी म्यां होती विनति तुजला त्याच समयीं;
असेंही माये! तूं ह्मणशिल; परी कारण तुला
कळोनी येतां तें करशिलचि निर्दोष मजला. ३

सोडोनि स्वाश्रितांतें प्रियसख **रिपन** स्वालया जात होता,
तेव्हां त्याला करावा अपशकुन कसा काढुनी दुःखवार्ता?
ह्यासाठींच स्वचित्तीं धडकत असतां शोकवन्ही, श्रमानें
साहोनी ताप त्याचा खचित दवडिला काळ हा ब्रह्मकन्ये! ४

शंका काय तुझी अझूनि फिटली नाहींच वाग्देवते!
प्रार्थी मी तुज,—सर्व संशय तुझे एकीकडे ठेव ते!
ये आतां न करीं विलंब! वदना सोडोनियां माझिया
दुःखोद्गारहि लागले अतिजवें बाहेर हे यावया! ५

झाला दुःसह दुःखताप ह्मणुनी छायार्थ चोहींकडे
साकांक्ष भ्रमतां, दुरोनि दिसला जो एक दृष्टीपुढें
तूझ्या वावटळांत सांपडुनियां काळा! कसा रे तरी
**फॉसेट**द्रुम उन्मळोनि पडला तो आमचा भूवरी! ६

घरीं दारीं आप्तांसह कलहभावा धरुनियां
जिथें जावें तेथें छळचि करिसी सोडुनि नया!
पुरे झालें वैरव्रत! छळहि केला बहु पुरे!
स्मरूं जातां तूझ्या कृति हृदय काळा थरथरे! ७

होवोनी दुर्विधीचे उघडचि बसलों दास आह्मी; परंतु
**इंग्लंदे** तो कळेना तुजहि विधि कसा जाहला दुःखहेतु!
किंवा हा जाहला जो प्रियसुतविरह प्राप्त तूतें अकालीं,
अस्मत्पापेंच त्याला सकलहि असती कारणीभूत झालीं! ८

हा! हा! पुत्रवियोग मात्र तुजला **आंग्लप्रसू** होय हा;
धैर्यस्तंभ परंतु मोडुनि पडे ह्या **आर्यभू**चा पहा!
गेला एक, तथापि काय दुसरे आहेत थोडे तुला?
कैवारी परि आमचा न दुसरा कोणी तसा राहिला! ९

'पोसाया असमर्थ आर्यजननी जी आपल्या बालकां
'तीला नागवुनी करें करितसां तीचे तुह्मी हाल कां?'
ऐसें स्पष्ट विचारितां निजजनां ज्यांची न लाजे मती,
**इंग्लंदे**! उदरीं तुझ्या उपजले **फॉसेट** ऐसे किती? १०

साक्षात्संबंध जीचा नसुनिच, अगदीं पाहिलेंही न जीला,
साऱ्या जन्मांत जीच्याकडुनि तिळभरी लाभ नाहींच झाला,—
ऐशा ह्या **आर्यभू**ची सतत निजमनीं कींव आणूनि घेता
तीचा कैवार रात्रंदिवस न उरला अन्य **फॉसेट** आतां! ११

कोणी ऐकोत, किंवा उठुनि भरभरां शीघ्र जावोत कोणी,
कोणी घेवोत जागेवर बसुनि सुखें झोंप, कोणी स्वकर्णीं
बोटें घालोत, मागें करुनि मुख पुढें पाठ बैसोत कोणी,
कोणी निंदोत, कोणी प्रलपुनि भलतें दूषवोत स्ववाणी; १२

कोणी हांसोत थोटें धरुनि समजुनि भ्रांतही आपणाला;
बोलोत स्पष्ट कोणी,—बरळत सुटला व्यर्थ हा हो कशाला!
दुःखें ह्या **आर्यभूचीं** तदपि न वदल्यावीण जो स्वस्थ राहे,
ऐसा **फॉसेट** आतां त्वदुदरिं दुसरा **आंग्लभू** कोण आहे! १३

होती निर्णय आमच्याच तिकडे दुःखासुखांचे तरी
आह्मीं आजवरी चढूं न शकलों ज्याची कधीं पायरी;
गान्हाणीं कळतील त्या परिषदा आतां जरी आमचीं,
गेला दाखवुनी खरा कळवळा तो एक **फॉसेटची**! १४

अज्ञानांध नये विचार करितां आधींच कांहीं जयां,
अंधें वाट कशी—कितीक ह्मणती—ह्या दाखवावी तयां?
डोळे झांकुनि अंध होउनि परी जे नाडिती दुर्बळां,
ऐशा डोळस दुर्जनांहुनि बरा तो आमचा आंधळा! १५

बुद्ध्या घालुनि धूळ लोकनयनीं जे त्यांप्रती वंचिती,
जन्मांधाहुनि अंध होत असुनी डोळेहि ते निश्चिती;
पाहे स्वानुभवें परंतु नर जो अन्या जनांची व्यथा,
होई डोळस तोचि दृष्टि नसली त्याला जरी सर्वथा! १६

कसाहि असला तरी हित करावया आमुचें
निरिच्छ करि यत्न तो, ह्मणुनि फार आह्मां रुचे;
रुचीस परि आमच्या रुचिर वस्तु जी आवडे
अकल्पितचि तीवरी दरवडा यमाचा पडे! १७

होता मित्रवरा! तुझा भरंवसा ज्या आर्यभूला पुरा,
कां अव्हेर तिचा तुला प्रियसख्या हा वाटला रे बरा!
ह्या आर्यांस तुझ्यासमान दुसरा त्राताच कोणी नसे,
जातां स्वर्गपथें तुवां निजमनीं हें नाणिलें रे कसें! १८

अन्नावांचुनि आपलींच मरती पोरें उपाशीं, तरी
पोसावे बहु लागतात दुसरे जीला भिकारी घरीं!
ती ही दीन अनाथ आर्यजननी त्राणार्थ कोणाकडे
डोळे लावुनियां सख्या! दिवस हे कंठील रे वांकडे? १९

'सारें वर्ष खपूनि पोटभरही दाणा न ज्यां सांपडे,
'द्यावा ज्यां प्रतिवत्सरीं कर तरी बावीसकोटी पडे;
'त्या ह्या आर्यकृषीवलांस अझुनी देणार दुःखें किती?—
आतां कोण असें विचारिल सख्या त्या पार्लमेंटाप्रती? २०

'अनायासें ज्यांच्या अगणित पिके मीठहि घरीं,
'जयां खावी लागे निमुट अळणी भाकर तरी;
'करा हो! त्या आर्यांवरि खचित कांहीं तरि दया!'—
स्वबंधूंना आतां विनविल असें कोण सदया? २१

'लंगोटीस पुरावयासहि पुरी चिंधी मिळेना जयां,
'नाहीं साधन मंगलाविण दुजें ज्यां पोट जाळावया,
'येती त्यांस न चारितां स्वपशुही द्रव्याविना काननीं'!—
सांगावे विजयेस हाल असले कोणीं तुझ्यावांचुनी? २२

'आटोपा हात, त्यांचें धन उधळुनियां भीक त्यां लावितां कां?
'देतां सारेंच त्यांचें लुटुनि, मग तिहीं मारिजे काय हाका?

'व्हा जागे व्हा पहा! ते इतर जन तुह्मां हांसती सानथोर'!—
बोले हें स्पष्ट आतां कवण तुजविना **पार्लमेंटा**समोर? २३

नाहीं एकहि आमचा प्रतिनिधी त्या **पार्लमेंटा**मधें
ऐसें जाणुनि **लालमोहन** पुढें केला तुवां जो बुधें,
झालें प्राप्त नसोनि पूर्ण यशही प्रारब्धकार्यी तया,
केली त्वां इतकी त्वरा प्रियसख्या स्वर्गास कां जावया? २४

त्या **घोसें** घोष आतां करकरुनि जरी शोषवीला घसाही,
यावें तैसें तरी त्या तुजविण सखया श्रेय येणार नाहीं!
मार्गे राहोनियां त्वां सतत बुधवरा! राखिजे पाठ ज्याची,
देशी तूं पाठ त्याला अहह! मग कशी वाट व्हावी तयाची?

वक्तृत्वें रमवो सभासदमनें **तेलंग**[१] आतां सुखें;
**मेथा**[२] मेघरवें निरंतर भरो दाही दिशांचीं मुखें;
मोहो **बद्रुदिन**[३] स्वबांधवजनां दावून वाक्संपदा;
काढो धुंडुनि **मंडलीक**[४]हि नव्या कोटिक्रमातें सदा; २६

सदा **दादाभाई**[५] निजजनहितार्थ श्रम करो;
स्वदेशप्रीतीचें व्रतहि **नवरोजी**[६] दृढ धरो;
सुधाराया लोकां सतत झटुनी **माधव**[७] पडो;
स्वबंधूंचे नीट श्रवण **मलबारी**[८]हि उघडो; २७

---

१. काशीनाथ त्रिंबक तेलंग. २. फेरोजशा मेरवानजी मेथा. ३. बद्रुद्दिन तैयबजी. ४. विश्वनाथ नारायण मंडलिक. ५. दादाभाई नवरोजी. ६. नवरोजी फर्दुनजी. ७. माधवराव गोविंद रानडे. ८. बैरामजी मेरवानजी मलबारी.

**राजा माधव**[1] राजनीतिनियमव्याख्या सुखानें करो;
चित्तीं घट्ट **सुरेंद्रनाथ**[2] सगळ्या देशाभिमाना धरो;
हो लोकप्रिय **सार्वलौकिकसभा**[3] याहूनि कोटीगुणें;
मित्रा ! केवि भरे परंतु पडलें जें त्वद्वियोगें उणें ? २८

आह्मी दैवविहीन यास्तव तुला ने मृत्यु मित्रोत्तमा !
तूझा काय उपाय त्यास ? वश तूं झालास सृष्टिक्रमा !
जा स्वर्गीं सुख भोग ! मात्र तिकडे जातांच **विश्वेश्वरा**
आधीं सांग—कृपावलोकन करीं **आर्यां**वरी ह्या जरा ! २९

गेला **फॉसेट** आतां रडुनि तुज कसा तो मिळे **आर्यमाते** !
सोडीं हा शोक सोडीं त्वरित करुनियां स्वाश्रुसंमार्जनातें.
ज्या आह्मां त्वत्सुतांनीं निशिदिनिं हृदयीं आपल्या सांठवाव्या,
शोकें त्या केवि त्याच्या उपकृति तुजला फेडितां सांग याव्या ?

ते त्याचे उपकार शक्य नससी फेडावया तूं, तरी
लोकीं स्वीय कृतज्ञता तरि करीं व्यक्त स्वयें लौकरी !
पुत्रांच्या तुझिया अखंड हृदयीं त्याची रहावी स्मृती
ठेवावी असली जगांत करुनी कांहीं तरी त्वां कृती ! ३१

लोकांनीं तुजला प्रवृत्त करिजे कार्यें कराया अशीं—
ह्याची त्वत्सुतमानसांस नकळे लज्जा नसावी कशी ?
झाली चूक, परंतु **आर्यजननी** ! आतां तरी यावरी
त्याची शक्यनुसार सत्वर करीं कांहीं तरी चाकरी ! ३२

१. सर टी. माधवराव. २. बाबु सुरेंद्रनाथ बानर्जी. ३. पुणें सार्वजनिकसभा.



# सती.

[ ह्या कवितेंत, कोणी स्त्री सती जाऊं पहात आहे अशी कल्पना केली आहे. ही कल्पना वर्तमान काळाकडे पाहतां विसंगत दिसेल खरी, तथापि पतीच्या प्रेताबरोबर स्मशानभूमिकेकडे धांव घेणारी, व तिकडून मोठ्या प्रयत्नानें मागें वळविल्यानंतर जलसमाधि घेऊं पहाणारी अशी एक दुसरी विधवा जशी प्रस्तुत लेखकाच्या तशीच पुष्कळ इतर लोकांच्याही पाहण्यांत आली असेल. ]

'गेला!—स्वर्गास गेला प्रियतम निघुनी! मी करूं काय आतां!
होता निश्चित होता त्यजुनि तनुस ह्या हा जरी प्राण जाता!
नाहीं! हा जात नाहीं! चिकटुनि बसला दुष्ट ह्या नष्ट देहा!
जाळा! हा देह जाळा! पतिसुख नसतां कासया पाहिजे हा? १

'लावा भूतदयेस आग तुमच्या! मी कायद्याच्या भया
नाहीं भीत ह्मणून साफ तुमच्या सांगा तुह्मी राजया!
काढोनि ज्वलनाननांतुनि मला, माझा बळी कासया
देतां भर्तृवियोगपावकमुखीं? ही कोठली हो दया? २

'झाला हा विरहाग्नि दुःसह बहू झाला! मरूं द्या मला!
घाला नेउनि देह हा झडकरी अग्नींत घाला चला!
व्हा व्हा शीघ्र तयार व्हा! निघुनि ही जाईल आतां घडी!
गेल्या ही, मग घातलीच समजा कूपांत मी ह्या उडी! ३

'रहा ह्मणतसां ह्मणा, पळ इथें न राहीन मी!
अहा! करुनि आग्रहा फुकट होतसां कां श्रमी?
पहा वर पहा जरा! बसुनि दिव्य यानीं पती
कसा क्रमित जातसे गगन देवलोकाप्रती! ४

'नका जाऊं घाई करुनि इतुकी ही प्रियकरा!
तुह्मासंगें येतें! क्षणभरि विमान स्थिर करा!
निघालें! मी आलें खचित! जन हो द्या मज रजा!
सरा मागें दादा त्वरित! वहिनी जा परत जा!' ५

'हा हा! हें ह्मणतेस काय! करिसी वेडेपणा काय हा!
ह्याचा तूंच जरा विचार करुनी ताई पहा गे पहा!
नाहीं भर्तृवियोग हा, तुजवरी आकाश हें कोसळे!
नाहीं दुःसह दुःख याहुनि दुजें आह्मांस हेंही कळे! ६

'प्राणत्याग करोनियां झडकरी ह्या घोर दुःखांतुनी
व्हावें मुक्त, विचार हाच पहिला येतो स्वभावें मनीं;
ताई! साहस हें परंतु असलें वाटे करावें जिला,
देहाचा उपयोग योग्य करितां यावा कसा गे तिला? ७

'भ्याली जी विरहव्यथेस ह्मणुनी झाली तनु त्यागिती,
कोणी शूर तिला ह्मणोत; न परी ताई! खरी शूर ती.
येतां दुःख पुढें न धीर धरवे आह्मां जरी माणसां,
ताई! सांग तरी मनुष्यपण हें लागेल केव्हां कसा? ८

'असह्य विरहव्यथा, असहनीय वैधव्यही,
ह्मणोनि विधवा त्यजी तनु; असे खरी गोष्ट ही.
परंतु करुनी अशा निपट राक्षसी साहसा
मिळेल सुखची पुढें—भरंवसाहि नाहीं असा! ९

'असें असुनि जी निरर्थकचि आत्मघाता करी,
ह्मणोत जन या महीवरि पतिव्रता ती खरी;
परंतु तरुनी स्वयें निजपतीस तारील ती
असें न सहसा घडे, ह्मणुनि जाणते सांगती. १०

'देह त्यागुनि ती पुढें स्वपतिला भेटे ह्मणावें, तरी
कोणी आजवरी तशी करुनियां आहे दिली खातरी?
शास्त्री पंडित वा पुराणिक असो—"हा प्राण कोणीकडे
जातो?—" हें पुसतांच गर्व सगळा त्यांच्या मतीचा झडे. ११

'कांहीं ठावठिकाण ठाउक नसो इच्छील जी जावया,
पातिव्रत्य तिचें तिला पतिकडे जाईल घेवोनियां;
देहांतीं मन हें परंतु विलया जाणार आहे जरी,
भेटीची पतिच्या उरेल न कळे कोठून इच्छा तरी! १२

'ह्मणुनि ह्मणतों ताई! आजी त्यजीं अविचार हा!
कवण तरला आहे लोकीं धरोनि दुराग्रहा?
ह्मणवुनि सती घेतां येवो अशा तुज साहसें;
खचित इतुकें सोपें ताई! सतीत्व परी नसे! १३

'सतीत्व तुज पाहिजे, सुयशही तसें पाहिजे,
उपाय असती तरी बहु तयास लोकीं दुजे.

त्यजोनि तनु लाभतें सुयश,—लाभती सद्गति,
तरी तनुस कां वृथा झिजविते तपस्वी यती? १४

'वेडी होती खचित ह्मणुनी काय गे राममाता
राहे मागें **दशरथ** नृप स्वर्गलोकास जातां?
होता जीचा तनय गुणधी **धर्म** धर्मावतार
त्या **कुंती**ला कळत नव्हतें काय हें धर्मसार? १५

'पुण्याची न सरस्वतीस करितां यात्री जियेच्या मिती,
जीचा या जगतींत आज महिमा सर्वत्र वाखाणिती,
वेडी होळकरीण काय तुजला वाटे **अहल्या**हि ती
देहाची ह्मणुनी तिनें न दिधली वैश्वानरीं आहुती? १६

'जो साक्षात् शिव या जगांत ह्मणती धर्मावना येतसे,
त्याची माय असोनि कां पतिसवें गेली **जिजाई** नसे?
क्षाळी **दिल्लि**पही पराक्रम जिचा पाहून दुःखासवें
कां ती जाय न नातसूनहि तिची **तारा** पतीच्यासवें? १७

'योषिद्रत्न पुन्हा सृजीन ह्मणण्यापेक्षां जिच्यासारखें
धात्यानें अभिमान सोडुनि मला वाटे रहावें मुकें;
देह त्यागुनि भुक्ति मुक्ति मिळल्या कां ती तरी आपली
शीर्षी घेउनि राज्यभार बसती **व्हिक्टोरिया** माउली? १८

'देहाचा उपयोग लोक ह्मणती ह्यांनींच केला खरा!
ताई! यास्तव सोड आग्रह पहा साध्वींकडे ह्या जरा!
नारी थोर कुळांतल्या सकल ह्या, यांच्या कथा ऐकुनी
आह्मांला उपयोग काय? सहसा ऐसें न आणीं मनीं! १९

'आल्या थोर कुळांत ह्या न ह्मणुनी विख्यात झाल्या भुवीं;
ताई! किंबहुना कुळांस महिमा ह्यांचाच दे थोरवी!
ऐशा पुण्यखनी दुज्या बहु जनीं आहेत गे जाहल्या,
लोकीं विश्रुत ह्या परंतु; ह्मणुनी म्यां आज सांगीतल्या. २०

'ह्या निःसीम पतिव्रता असुनियां जातां परत्रीं पती,
ताई! केवळ आपल्या सुकृतिनें साध्वीपदा पावती.
गेला कांत मरोनि कीं युवतिचें कर्तव्य आटोपलें—
ऐसें मानुनि काय दिव्य यश हें आहे तिहीं जोडिलें? २१

'होत्या ह्या तुजसारख्या पतिसवें जायास वेड्या सती,
लोकीं ह्या उरलीच आज नसती त्यांच्या पतींची स्मृती;
मागें राहुनि वाढवीत पतिच्या जाई सदा कीर्तिला—
भर्तृप्रेम तुझें असेंच बहुधा सांगेल ताई तुला! २२

'नारी वा नर हो—मनुष्यपण हें पुण्यें जया लाधलें,
तेणें शक्त्यनुसार कार्य इथलें केलें न जों आपलें—
द्याया सोडुनि तोंच ह्या तनुस तो पाहील बुद्ध्या जरी,
त्याचीं ऐहिक पारलौकिक सुखें दोन्ही बुडालीं तरी. २३

'सांगूं मी तुज फार काय? न धरीं आतां पुढें आग्रहा!
आहे प्राण परोपकार करुनी तों कष्टवीं काय हा!
सत्कार्यें करुनी स्वकीर्ति कविला लावोनियां गावया
ताई! जा मग तूं चिरंतन सुखा निश्चिंत भोगावया!' २४





## मराठी ग्रंथकारांस प्रार्थना.

ह्मणतात जे—'मराठी भाषा होणार ही असे नष्ट;
'मिळणार काय करुनी व्यर्थ हिला वांचवावया कष्ट?' १

त्यांना हेंच पुसा कीं—'मरणोन्मुख होय आपली माय,
'ह्मणुनी औषध कांहीं पुत्रीं देऊं नये तिला काय?' २

माता तशी स्वभाषा सेवाया होय आपणां उचित;
किंबहुना मातेहुनि अधिक हिची योग्यता असे खचित. ३

दे जन्म मात्र माता, भाषा व्यवहार चालवी सकळ;
मातेशिवाय जन्महि जाय, न भाषेशिवाय एक पळ. ४

रक्षी ह्मणूं, तरी ती बाल्यापुरतीच काळजी वाहे;
आबालवृद्धरक्षण-कार्यी ही दक्ष सारखी राहे. ५

उपकार थोर ऐसे नित्य जिचे आपणावरी होती,—
हो कां दीन, कधीं नच योग्य उपेक्षावया तरी हो ती. ६

यास्तव ज्या कोणां ह्या निजभाषेचा असेल अभिमान,
देवोत सादरें मम विनतिकडे ग्रंथकार ते कानः— ७

ज्यांच्या पराक्रमांचीं आनंदें गातसां तुह्मी गाणीं,
त्या शूर पूर्वजांची तुमच्या ही चालली लया वाणी! ८

त्यांचें तुमचेंहि तुह्मां राखायाचें असेल नांव, तरी
द्या हात हीस द्या हो पुण्याचें श्रेय घ्यावया पदरीं! ९

कोणी साह्य करो, वा न करो; कर्तव्य होय जें कर्म,
केलेंच पाहिजे तें; श्रेयस्कर हाच आपणां धर्म. १०
जातां कशास राजद्वारीं? मिळणार काय हो तेथें—
गुणदोषनिर्णयाचें काम दिलें आर्जवाकडे जेथें? ११
स्वर्गीं प्रयाण केलें जेव्हां त्या दानशूर **भोज** नृपें,
समजा तयींच राजद्वारांना घट्ट लागलीं कुलपें. १२
लोकीं वदान्य राजे रंकहि आहोंत आपणचि आजी;
देणें घेणें सर्वहि चालूं द्या आपआपसांमाजी. १३
लोकमतावरि तैसे अवलंबुनि फारसे नका राहूं;
कोणी निंदो अथवा वंदो, तिकडे कधीं नका पाहूं. १४
भ्यावें जनापवादा, तों तों भिववील फार तो कुतरा;
हव्यासही स्तुतीचा भ्रमवी जनमानसा जसा धुतरा. १५
योग्यायोग्यपरीक्षण-शिक्षेला दीर्घकाळवरि मुकलें,
भलतीकडेच ह्मणुनी आहे इकडील लोकमत झुकलें. १६
ग्रंथप्रसार पुष्कळ जनपदभाषेंत जों नसे झाला,
लागायाचें नाहीं जनमत हें तोंवरी सुमार्गाला. १७
यास्तव विद्वज्जनहो! उघडा उघडा स्वबुद्धिभांडारें;
अज्ञानध्वांत हरा नानाग्रंथप्रकाशनद्वारें. १८
'व्यर्थ कशास लिहावे ग्रंथ, जरी त्यांस वाचकचि नसती?'
ह्या दुष्ट कल्पनेची होऊं देऊं नका मनीं वसती- १९

येतील जे कराया साह्य, तयां आदरें ह्मणाया या !
जातील दूर त्यांच्या मागें लागूं नका तुम्ही बायां ! २०
जे लाजतील कोणी तुमच्या लेखां धरावया हातीं,
समजा कृतघ्न पोरें झालीं उद्युक्त मातृघाता तीं. २१
जे ही स्वमाय सोडुनि परकीचा लोभ इच्छिती लटका,
सापत्नभावनेचा लागूं द्या त्यांस चांगला चटका. २२
न ह्मणा रसिकचि नुरले; दैवाचा जाहल्यामुळें कोप
आहे संप्रति त्यांना बांधवहो गाढ लागली झोंप. २३
त्यांतच्चि व्हावा तैसा होई ग्रंथप्रकाशही न जनीं;
निजतील कां न मग ते सरली नाहींच मानुनी रजनी? २४
रजनीभ्रम तो त्यांचा नाहीं निःशेष पावला नाशा,
तोंवरि चीज गुणांचें तुमच्या होईल ही नसे आशा. २५
ग्रंथप्रकाश करितां यास्तव अगदीं सरूं नका मागें;
ह्मणजे उजाडलें हें जाणुनि होतील तेच हो जागे. २६
ते जाहल्यास जागे, सदभिरुचीलाहि जागवायास
पडतात आज तैसे न तुह्मां पडतील फार आयास. २७
सदभिरुचीच्या योगें पावुनियां नित्य योग्य संस्कारा,
राहील शुद्ध होउनि जनमत, त्याचा झडोनि मळ सारा. २८
मग जो तुह्मां जनाश्रय न मिळे ह्मणुनी तुह्मी असां खिन्न,
सेवा करावयाला तुमची लागेल तो अविच्छिन्न. २९

ज्यांचे करहि मराठी-ग्रंथस्पर्शें विटाळती आज,
वाटेल त्यां स्वपूर्वज ह्मणतां त्यांच्याच वंशजां लाज. ३०
जे झांकितात संप्रति येतां पाहुनि तुह्मांस दरवाजे,
कीर्त्यर्थ तेहि तुमच्या भजनीं रततील छत्रधर राजे. ३१
क्षयरोगमुक्त अंतीं तुमची होऊन देशभाषा ही,
तुमच्या भव्य यशानें भरुनी टाकील हो दिशा दाही! ३२
करितां प्रयत्न इतके श्रेय खरोखर मिळेल या कामीं,
करवे न ही प्रतिज्ञा; ऐका तरि सांगतों तुह्माला मीः ३३
कीं, सिद्ध यत्न होतां, क्लेश महाराष्ट्रभारतीचे या
होऊन नष्ट, लोकीं निःसंशय पात्र व्हाल या श्रेया; ३४
दुर्दैवानें तुमचे यत्न जरी हे न शेवटा गेले,
झालें स्वधर्मरक्षण; समजा मोठेंच कार्य हें केलें. ३५
दोन्हीकडोनि अंतीं लाभाची जोड आपणां आहे;
यास्तव तरी करा हो इतका हा कार्यभाग उत्साहें! ३६
आला प्रसंग ह्मणुनी गेलों बोलून शब्द जे चार,
घ्या गोड मानुनी ते बुध हो असले जरी कडू फार. ३७

